# आमचें स्त्रीजीवन

लेखिका

**वसुंधरा पटवर्धन**

प्रस्तावना

प्रा. श्री. के. क्षीरसागर




१९४९

तीन रुपये

# प्रस्तावना

प्रस्तुत पुस्तकाचा विषय फार जुना आहे. कारण इंग्रजी अंमलानंतर अखिल हिंदुस्थानांत आणि त्याबरोबरच महाराष्ट्रांत ज्या सुधारणेच्या चळवळी झाल्या, त्यांत 'आमच्या स्त्रीजीवना'लाच प्राधान्य होतें. सतीबंदी, संमति-वय, पुनर्विवाह, शारदा कायदा यांपैकीं प्रत्येक सुधारणेच्या निमित्तानें हिंदू स्त्रियांच्या जीवनावरच चर्चा झालेली आहे. कायदा आणि प्रचार करणाऱ्या समाजकार्यकर्त्यांबरोबर साहित्यिकहि या प्रश्नाला प्राधान्य देतच होते. कादंबऱ्या व नाटकें धडपणें लिहितां येऊं लागण्यापूर्वीपासूनच, साहित्यिकांनीं स्त्रियांची करुण स्थिति हा साहित्याचा प्रमुख विषय करून टाकला होता. आणि तरीहि हें पुस्तक एका अर्थानें अभिनव आहे असें मला वाटतें.

या पुस्तकाच्या लेखिका वसुंधरा पटवर्धन, या एकादी स्त्रियांची संस्था चालविणाऱ्या पोक्त समाजसेविकाहि नाहींत; कीं-निदान अद्यापपर्यंत तरी-प्रसिद्ध साहित्यिकांतहि मोडत नाहींत. समाजांतील सुखदुःखांचे आंकडे जमा करणाऱ्या त्या कोणी संशोधक विदुषीहि नाहींत. परीक्षांच्या द्वारें होणारें शिक्षण त्यांच्या पदरांत पुरतें पडण्यापूर्वींच त्यांच्यावर संसाराची जबाबदारी पडली. अशा स्त्रीनें लिहिलेल्या या पुस्तकास जर कोणत्या कारणानें महत्त्व असेल तर तें अनुभव व अवलोकन यामुळेंच असणार हें उघड आहे व त्याच दृष्टीनें मीहि या पुस्तकाला महत्त्व देतों.

केवळ तत्त्व म्हणून स्त्रियांवरील अन्यायांची चर्चा करणें आणि स्त्रियांचें दुःख जाणून व्यथित होणें यांत फरक आहे. अखिल स्त्रीजातीचा कैवार घेणें सोपें आहे; पण एकट्या दुकट्या स्त्रीला विपत्कालीं आधार देणें कठीण आहे. फार काय? तिचें दुःख जाणणें, कबूल करणें देखील कठीण आहे. स्त्रियांच्या उद्धारार्थ संस्था काढणाऱ्या आणि चालविणाऱ्या सुधारकांत देखील, ही परदुःख ओळखण्याची शक्ति नेहमींच असते असें नाहीं. आजवर तरी सुधारणेचें प्रतिपादन करणारांत, अमूर्त ( Abstract ) स्त्री-स्वातंत्र्याची निर्गुणोपासनाच अधिक दिसे; तर स्त्रियांच्या संस्था चालविणारांत, खटपटी

कष्टाळू वृत्तीच काय ती दिसून येई. या वृत्तीबरोबरच, स्त्री मोहांत पडण्याची भीति उरूं नये म्हणून थोडी फार रुक्षता, आणि ‘ कांते’ बरोबर ‘कनका ’चाहि बन्दोबस्त व्हावा म्हणून हिशोबी वृत्ति, ठळकपणे दिसली कीं, आम्हां महाराष्ट्रीयांच्या पसंतीला उतरणारा ‘अबलोद्धारक’ तयार झाला असें समजावें !

परंतु समाजरचनेसारखी नाजूक, गुंतागुंतीची रचना उभी करतांना, मनुष्यानेच मनुष्यासाठीं जें दुःख जागजागीं पेरून ठेवलेलें असतें तें ओळखण्यास, केवळ समाजशास्त्राची सामुग्री पुरी पडत नाहीं; आणि तें निवारण्यास कष्टाळूपणा आणि सोवळेंपणा एवढ्यावर भागत नाहीं. त्याला पहिली जोड त्वरित आणि व्यापक सहानुभूतीची लागते; व म्हणूनच सामाजिक दुःखांचें चित्रण व निवारण हा सुधारकांइतकाच साहित्यिकांचाहि प्रांत ठरतो. कारण दुसऱ्याच्या सुखदुःखांशीं समरस होण्याचें सामर्थ्य, कल्पनाशक्तीच्या आणि सहृदयतेच्या जन्मजात देणगीमुळें, त्यांच्या अंगीं अधिक असतें.

याचा अर्थ प्रत्येक साहित्यिक हा आदर्श सुधारक अगर समाजसेवक असतोच असा नव्हे. किंबहुना त्याच्या साहित्याने सुधारणेस प्रत्यक्ष मदत होईलच असेंहि मला म्हणायचें नाहीं. दुसऱ्याचें दुःख जाणण्यास लागणारा पहिला नैसर्गिक गुण त्याला इतरांहून अधिक लाभलेला असतो, एवढेंच मला म्हणायचें आहे. या दृष्टीनें समाज-दुःखचित्रणाचें आणि निवारणाचें कार्य करणारांत, महाराष्ट्रांत हरिभाऊ आपटे यांस अर्थातच फार श्रेष्ठ—अद्वितीय—स्थान आहे, यांत शंका नाहीं. आणि त्यांच्यानंतर बरीच जागा मोकळी सोडून गडकऱ्यांचा क्रम लागेल असें मी म्हणेन.

आणि तरीहि महाराष्ट्रीय स्त्रीला तिचा शरदबाबू अद्यापि लाभलेला नाहीं असेंच म्हणावें लागेल ! हरिभाऊंची ‘ सामाजिक प्रतिभा ’ विशाल असली, तरी त्यांनीं व्यक्तिहृदयाच्या व्यथेहून ती वाढविणाऱ्या रूढीच्या आणि सामाजिक संकेतांच्या क्रूरतेवरच, आपल्या चित्रणाचा रोख अधिक ठेवला. तर उलट गडकऱ्यांनीं, सौंदर्यवादी कवींचा स्त्रीपूजनाचा रिवाज चालवून, स्त्रियांच्या दुःखांपेक्षां त्यांच्या सहनशक्तीचें आणि पावनतेचेंच स्तोत्र अधिक गायिलें. पण ‘ कामिनी ’ आणि ‘ अबला ’ या दुहेरी नात्यानें कवींचा

आवडता विषय झालेल्या स्त्रीजातीचें विविध, विचित्र आणि विरोधी गुण-दोष, बंगालच्या त्या असामान्य जादुगारानें ज्या जादूनें मूर्तिमंत चितारलें आहेत, तिला भारतीय भाषांतच काय, पण अन्यत्रहि तोड असेलसें वाटत नाहीं.

त्या वंगीय जादुगाराचें येथें स्मरण होण्याचें कारण एवढेंच कीं, स्त्रियांचें दुःख आणि स्त्रियांचे प्रश्न हे इतके गूढ आहेत कीं शरदबाबूंची प्रतिभा आणि शरदबाबूंचें औदार्यच तेथें आठवावे ! महाराष्ट्रांत शरदबाबू निर्माण होत नसले, तरी पंडिता रमाबाईसारखी बुद्धिमान्, धाडसी आणि कर्तबगार स्त्री मात्र इतर कुठल्याहि प्रान्ताच्या आधीं निर्माण झाली. या विदुषीनें * तीन पिढ्यांपूर्वी लिहिलेला High Caste Hindu Woman हा ग्रंथ म्हणजे अनेक शतकानंतर,—किंबहुना इतिहासारंभापासून प्रथमच !—हिंदू स्त्रीच्या दुःखानें, हिंदू स्त्रीच्या कंठांतून बाहेर काढलेला पहिला आर्त स्वरच होय, असे म्हणतां येईल ! पण पंडिता रमाबाई या खिस्ती झाल्यानें महाराष्ट्रीय कार्यकर्त्यांत अप्रिय झाल्या. आणि लेखक अप्रिय ठरल्यावर त्याच्या लिखाणांतील अप्रिय सत्याकडे दुर्लक्ष करण्यास अधिकच सवड सांपडते, असा अनुभव आहे !

वास्तविक स्त्रियांनी स्त्रियांच्या प्रश्नावर लिहिलेली पुस्तकें महाराष्ट्रांत झाली याहून अधिक निर्माण व्हायला हवीं होतीं. स्त्रियांनीं कादंबऱ्या लिहिल्या; गोष्टी लिहिल्या; लेख लिहिले. परंतु त्यांत जिवंत स्त्रियांच्या खऱ्याखुऱ्या प्रश्नापेक्षा, लोकप्रिय लेखकांच्या पुस्तकांनीं लोकप्रिय करून ठेवलेल्या अवास्तव प्रश्नांचाच प्रपंच अधिक केलेला आढळे. कधीं कधीं प्रश्न खरे असूनहि ते इतक्या नाटकी भाषेंत मांडलेले असत कीं, त्यांत स्त्रियांच्या दुःखापेक्षां स्त्रियांच्या नाटकीपणाची आणि अनुकरणप्रियतेचीच प्रतीति अधिक यावी !

वसुंधरा पटवर्धन यांच्या पुस्तकांत विवेचिलेले स्त्रीजीवनांतील प्रश्न नवीन आहेत असें नाहीं. किंबहुना त्यांचें विवेचन व त्या विवेचनांतील भाषा हीं

---

*हा ग्रंथ १८८७ सालीं प्रसिद्ध झाला; पण त्याच्याहि आधी (१८७८) वयाच्या केवळ विसाव्या वर्षी, पं. रमाबाईंनीं कलकत्ता येथें विद्वत्ताप्रचुर व्याख्यानें देऊन हिंदू स्त्रियांच्या दुःखांना वाचा फोडली होती.

देखील प्रथमदर्शनीं जुनीं आणि परिचयाचीं वाटतात. पण थोड्याफार परिचित प्रस्तावानंतर नेहमींच्याच प्रश्नांस त्या नेहमींहून एकदम वेगळें वळण देतात; निदान अनपेक्षित वळण देतात. कारण इतकें साधें लिहिणारी स्त्री, सामाजिक प्रश्नांत, इतके पुढारलेले विचार आग्रहानें प्रतिपादील, अशी वाचकांची अपेक्षा नसते! विशेषतः अपत्यवती व पोक्त विधवा स्त्रियांचा प्रश्न, घटस्फोटाचा प्रश्न वगैरेंच्या विवेचनांत त्यांनीं जितकी धीट व खोल मीमांसा केली आहे, तितकी त्यांच्यासारखी स्त्री करूं धजेल अशी वाचकाची कल्पना नसते. परिचित भाषेंत सांगावयाचे, तर वैवाहिक सुधारणा, स्त्रीस्वातंत्र्य, वगैरे बाबतीत .'मूलगामी' (radical) पुनर्घटना पत्करणाऱ्या विचारवंतांत त्यांची गणना करावी लागेल. पण सामान्यतः अशा प्रकारचें मूलगामित्व स्वीकारणारे लेखक, ज्या इतर साहित्याचें, विद्वत्तेचें, व विचारसरणीचें दर्शन घडवितात, त्यांचा मात्र या स्वयंशिक्षित विचारवतीच्या प्रतिपादनांत संपूर्ण अभाव आढळत असल्यानें, तिच्या या पुस्तकांत साधेपणा आणि अनपेक्षितपणा यांचें एक आश्चर्यकारक मिश्रण आढळतें !

पण मूलगामित्व किंवा क्रांतिकारकता, ही दीर्घ शिक्षणानें किंवा पाश्चात्य पद्धतीच्या राहणीनें प्राप्त होते, या आपल्या सर्वसामान्य कल्पनेंतच वरील आश्चर्याचें मूळ आहे. खरी क्रांतिकारकता अवलोकन, आपत्ति आणि सहानुभूति यांच्या कृपेनें, अशिक्षितांच्या अंगीहि जितक्या लवकर बाणते, तितक्या लवकर, सुस्थित आणि संवेदना—शून्य व्यक्तींच्या अंगी ती युरोपच्या हवेमुळेंहि भिनत नाहीं ! वसुंधराबाई स्त्रियांच्या प्रश्नांच्या मूळापर्यंत जाऊन पोहोंचल्या आहेत, याची एकच खूण सांगायची झाली, तर त्यांनी स्त्रियांच्या आर्थिक स्वातंत्र्यास दिलेलें महत्त्व ही सांगता येईल. स्त्री-जीवनाच्या आर्थिक बाजूकडे त्या कोणत्याहि 'इझम्'च्या वाटेनें पोहोचल्या नसून, आजूबाजूच्या स्त्रियांच्या छप्पन्न तऱ्हांच्या आपत्तींशीं सदयतेनें समरस होऊन पोहोचल्या आहेत. व यामुळेंच त्यांचें विवेचन अशिक्षितांनाहि सहज पटण्यासारखें व सुशिक्षित सनातन्यांना अडचणींचें वाटण्यासारखें झालें आहे.

केवळ प्रौढ वय झालें म्हणून, अगर पहिल्या घरचीं अपत्यें आहेत म्हणून डावलण्याइतका, प्रौढ स्त्रियांच्या एकलेपणाचा प्रश्न उपेक्षणीय नाहीं, असें त्यांनीं जोरानें प्रतिपादिलें आहे. आर्थिक प्रश्नांचा विचार करतांना त्या

जितक्या वास्तववादी झाल्या आहेत, तितक्याच वैवाहिक सुखाचा विचार करतांना त्या भावनावादी झाल्या आहेत, ही गोष्ट निर्देशनीय आहे. कारण सामाजिक प्रश्नांचा आणि विशेषतः उच्चवर्णीय स्त्रियांच्या विवाहाचा विचार करतांना माणसे पुष्कळदां कुठलें तरी एकच टोंक धरून बसण्याची चूक करतात. जुने लोक वंशवर्धन व गृहरक्षण यांच्या खातर भावनांना फांशीं फर्मावीत; तर नवे क्रांतिवादी लोक, अर्थप्राधान्य आणि बुद्धिप्रामाण्य यांच्या पूजनार्थ भावनांची अवगणना करीत आहेत. प्रौढ स्त्रियांनाहि पुरुषाच्या प्रेमाशिवाय जीवन कंठणें किती क्लेशकारक होतें, यासंबंधींचें लेखिकेचें विवेचन या दृष्टीनें वाचनीय आहे. तसेंच प्रेमशून्य विवाहाची बाजू सांवरतांना, रुक्ष व्यवहारी मंडळीकडून विचारल्या जाणाऱ्या "आमचा नाहीं कां संसार झाला?" या प्रश्नाची त्यांनीं तळमळीनें केलेली चर्चाहि, या दृष्टीनेंच निर्देशनीय आहे.

प्रीतिविवाह, स्त्रीस्वातंत्र्य, पुनर्विवाह, घटस्फोट या प्रश्नांवर, पुरोगामी आणि 'एकदम' पुढारलेले विचार बोलण्याची व लिहिण्याची जणूं एक फॅशनच पडल्यामुळें, पुष्कळदा आपणापैकी प्रत्येकाच्या पोटांत दडलेला सनातनीपणा, आपला आपल्यालाच दिसत नाहीं! व यामुळेच अशा अंतरीच्या तळमळीनें लिहिलेल्या पुस्तकांची आत्मपरीक्षणार्थ अद्यापिहि गरज आहे. एखाद्या सपत्निकाने द्वितीय विवाह केल्यास आपण कारणाची चौकशी न करतांच त्याला दोषी ठरवून मोकळे होतो. प्रौढ स्त्रीपुरुषांनीं परिचयोत्तर केलेल्या विवाहाकडे (त्या विवाहाच्या प्रयोजनांत हात भिजेपर्यंत!) एक 'भानगड' म्हणून बोट दाखवून कुजबुजणारे 'सुधारक' वीर अद्यापिहि आहेत! आणि घटस्फोट घेऊ पाहणाऱ्या, अगर घेऊन मोकळ्या झालेल्या स्त्रियांसंबंधी हवे ते ग्रह करून घेणे, हा तर आपल्यापैकीं बहुतेकजण आपला जन्मसिद्ध हक्क समजतात!

नुकताच घटस्फोट घेतलेल्या एका सुशिक्षित सुस्वरूप तरुण स्त्रीसंबंधीं, मी (कां कोण जाणे!) अशी कल्पना करून घेतली होती कीं, अन्य पति पत्करण्याच्या इच्छेनें अगर तयारीनेंच, तिनें हा अप्रिय खटाटोप केला असावा. लवकरच तिला अनुरूप असा द्वितीयसंबंध घडून येण्याची शक्यताहि उत्पन्न झालेली होती. पण जेव्हां तिनें त्या संधीचा तत्काल अव्हेर

केला, तेव्हां घटस्फोट घेणाऱ्या स्त्रियासंबंधीं आपण कित्येक गोष्टी निष्कारण गृहीत धरतों, असें माझें मलाच कळून आलें. समाप्त झालेल्या तिच्या त्या विवाहासंबंधामुळें, तिला 'विवाहा' संबधींच इतकी शिसारी आली होती, की आपल्या एकुलत्या एका मुलाकडे पाहून उरलेलें दीर्घ जीवन कंठण्याचें तिनें ठरविलें होते.

अनेक वर्षें अनन्वित विटंबना सहन केल्यावर नाइलाजानें घटस्फोटाची वाट धरणाऱ्या एकाद्या प्रौढ—कदाचित् रूपहीनहि—स्त्रीसंबंधीं मनुष्य जेव्हां—"आतां हिला कोण पत्करणार?" असा प्रश्न हंसत हंसत विचारतो, तेव्हां तो अनेक गोष्टी अडाणीपणानें गृहीत धरीत असतो.

आणि स्त्रियांचे प्रश्न आपण पुष्कळदां—कां कोण जाणे!—हंसत हंसतच सोडविण्याचा प्रयत्न करतों! पण त्याचा संबंध हास्यापेक्षां अश्रूंशींच अधिक असतो हें आपण विसरतों.

कविवर्य मैथिलीशरण गुप्त लिहितात,

अबला जीवन! हाय तुम्हारी यही कहानी।
आँचलमें है दूध! और आँखों मे पानी॥

स्त्रीजीवनसुधारणेच्या उघड हेटाळणीचा काळ संपून, आतां प्रच्छन्न गैरसमजांचा काळ मागे राहिला आहे. जुने सुधारक पुस्तकी असोत, कीं रुक्ष असोत; त्यांनी हेटाळणीला तोंड देऊनच हेटाळणीचें भूत गाडलें, याबद्दल आजच्या स्त्रियांनी त्यांचे उपकार मानले पाहिजेत. यापुढचा काळ पुस्तकी प्रतिपादनाचा आणि पोषाखी संस्थांचा नसून, सहृदयतेनें व माणुसकीनें, स्वजातीचें दुःख ओळखणाऱ्या, चितारणाऱ्या, आणि निवारणाऱ्या साध्यासुध्या स्त्रीसेविकांचा आहे. स्वानुभव आणि सहानुभूति यांबरोबरच अशा स्त्रियांना, ब्रह्मीभूत भगिनी निवेदिता, सौ. सावित्रीदेवी मुखर्जी, शीलवतीबाई केतकर यांच्या सारख्या स्त्रियांच्या विचारांपासून आणि जीवनापासून स्फूर्ति घेतां आली, तर अबलोद्धाराबरोबर त्या राष्ट्रोद्धारहि करूं शकतील. पांडित्यांत पुरुषांनाहि मागें टाकणाऱ्या, धैर्यांत इतिहासपुराणांतील स्त्रीरत्नांचें स्मरण घडविणाऱ्या, परदेशांत जन्मून आमच्या देशाला व धर्माला आपला मानणाऱ्या, या थोर स्त्रियांचीं नांवें 'विभावरी शिरूरकर,' 'मालतीबाई दांडेकर' या नावांइतकींहि आमच्या सुशिक्षित

स्त्रियांच्या तोंडीं नसतात, ही स्थिति चिंतनीय नव्हे का? गेल्या पिढींतील सुधारक आणि या पिढींतील साहित्यिक, यांच्याहून श्रेष्ठ मानवी नमुने आमच्या प्रामाणिक समाजसेविकांनाहि दिसत नाहींत ही दुर्दैवाची गोष्ट होय!

महाराष्ट्रीय स्त्रियांतून असामान्य कवयित्री अगर कादंबरीलेखिका कदाचित् निघणार नाहींत; परंतु त्यांच्या बुद्धिमत्तेबद्दल, धैर्याबद्दल आणि व्यवहारकुशलतेबद्दल मात्र मला शंका नाही. स्त्रियांच्या वाटयाला पुरुषांहून अधिक दुःख येते, हे सर्वमान्य आहे. आणि पुरुषांहून स्त्रिया अधिक वास्तववादी असतात असें माझे वैयक्तिक मत आहे. पण सामाजिक बाबतींत मूलगामी—radical—दृष्टिकोन पत्करण्यास दुःखाचा अनुभव आणि वास्तववादी दृष्टि या दोनच गोष्टी पुरेशा असतात! व म्हणूनच, आपण समजतों त्यापेक्षां, स्त्रियांत क्रान्तिकारकतेची बीजें अधिक असतात.

'क्रान्ति' हा श्रीमंत स्त्रियांचा एक दागिना नसून, दुःखांशीं झगडून बाहेर पडलेल्या सर्वसामान्य स्त्रीचा हक्क आणि अधिकार आहे, हे आमच्या सामान्य स्थितींतील स्त्रियांना कळूं लागेल, तर त्या स्त्रियांचाच काय, पण पुरुषांचाहि उद्धार करतील.

महाराष्ट्रीय स्त्रियासंबंधींच्या या आदरभावामुळें आणि आशावादामुळेंच, लेखिकेशीं पूर्वपरिचय (व पूर्ण मतैक्य) नसतां, मी ही प्रस्तावना लिहिण्याचें आनंदानें पत्करलें.

स्त्रियांच्या प्रश्नांसंबंधीं वास्तववादी दृष्टीनें विचार करण्यास या पुस्तकाचें साहाय्य होईल, आणि तळमळीनें आणि अकृत्रिम शैलीनें लिहिलेल्या एका पुस्तकाची मराठी वाङ्मयांत भर पडेल, असा मला भरंवसा आहे.

तुकाराम-आश्रम<br>
टिळकवाडी पुणें २<br>
२९–५–४९

श्रीकृष्ण के० क्षीरसागर

---

# दोन शब्द

हें पुस्तक मीं लिहावयास घेतलें त्या वेळेची माझी भूमिका थोडी स्पष्ट करणें जरूर आहे. या पुस्तकांत मी फक्त साक्षर व सुशिक्षित स्त्रियांचाच विचार केला आहे. हिंदुस्थानांतील सर्वच वर्गांतील स्त्रीजीवनाविषयीं कोणी आपले विचार लिहिल्यास तें पुस्तक अधिक उपयुक्त होईल हें खरें. परंतु मला महाराष्ट्रीय स्त्रियांचेंच जीवन माहीत आहे. अर्थात् जें जीवन मला माहीत नाहीं त्याचा समावेश या पुस्तकांत मी केला नाही.

हें पुस्तक लिहितांना मी अेका गोष्टीवर विशेष कटाक्ष ठेविला होता. जीवनाविषयक प्रश्न नुसत्या पुस्तकी वाचनानें सुटत नाहींत. म्हणून " आमचे विवाह,' 'पुनर्विवाह ' व ' घटस्फोट ' या प्रश्नांसंबंधीं मी अनेक सुशिक्षित अशिक्षित, प्रौढ व तरुण स्त्री–पुरुषांशी चर्चा केली आहे, त्यांचे अनुभव ऐकले आहेत; आणि ज्यांच्यावर कांहींना कांही प्रसंग येऊन गेले आहेत, त्यांच्या मनाचा कानोसा मी घेतला आहे. त्यामुळें अनेकींचें जीवन मी जवळून निरखून पाहूं शकलें. खरोखरी कुठें खटकतें आहे हे पाहण्याचा मी प्रयत्न केला; आणि मला जें वाटलें तें मी स्पष्ट शब्दांत मांडलें.

असो. या विषयावर लेख लिहिण्यास 'वसंत'चे माजी सहसंपादक श्री. वा. ग. तळवलकर यांनीं मला प्रोत्साहन दिल्याबद्दल त्यांचे मला प्रथम आभार मानले पाहिजेत. तसेंच 'वसंत'चे संपादक श्री. दत्तप्रसन्न काटदरे यांनीं माझे लेख छापून बहुसंख्य वाचकवर्गाचा लाभ मला करून दिला यासाठीं मी त्यांची फार आभारी आहे. त्याचप्रमाणें सुप्रसिद्ध प्रकाशक श्री. गो. रा. पाटणकर यांनीं सुबक पुस्तक छापलें व प्रसिद्ध चित्रकार श्री. मुळगांवकर यांनीं सुंदर चित्रानें पुस्तकाच्या सजावटींत भर घातली म्हणून मी त्यांचीहि फार आभारी आहे.

शेवटीं आभार मानावयाचे म्हणजे प्रा. श्री. के. क्षीरसागर यांचे. त्यांच्या लेखनाची मी चाहती आहे. मार्मिक टीकाकार म्हणून त्यांचा मोठा लौकिक आहे. अशा थोर साहित्यिकानें माझ्याशीं चर्चा करून माझ्या पुस्तकास प्रस्तावना लिहिली याबद्दल मी त्यांची अत्यंत आभारी आहे.

श्री. सौ. रुक्मिणीबाअी रानडे यांना त्यांच्या प्रेमळ अंतःकरणाचा आणि बुद्धिमत्तेचा आदर म्हणून माझें पहिलें पुस्तक अर्पण करीत आहे.

—वसुंधरा पटवर्धन

# झोंपेंतून जागृतीकडे : : १

स्त्रियाच्या उन्नतीच्या डका–नौबती आज इतकी वर्षे झडत आहेत की खरोखरीच स्त्रिया उत्कर्षाच्या शिखरावर जाऊन पोचल्या की काय असा भास व्हावा. पण आजूबाजूला निरखून पाहिले तर आम्ही स्त्रिया ज्या जागी उभ्या होतों तिथून कांही फारशा पुढें सरकल्या आहोत असें वाटत नाही. काही मूठभर सुशिक्षित आणि शहरात रहाणाऱ्या कर्तृत्ववान, अपवादभूत स्त्रिया वगळल्या तर एकंदर आपला स्त्रीसमाज अजून अंधारांत चाच-पडतो आहे असे दिसेल. डोळे उघडून प्रकाशाकडे पहाण्याची छाती त्याला होत नाही म्हणा, इच्छा, उत्साह नाही म्हणा, किंवा आमची सामाजिक आर्थिक परिस्थिति म्हणा, पण असे आहे ही गोष्ट काही खोटी नाही. आपल्या भोवतालच्या सर्वसामान्य सुशिक्षित, पदवीधर स्त्रियासुद्ध जमेला धरून असे म्हणतां येईल की, आमची सुधारणा काय ती फक्त पोषाखात आणि नटण्यामुरडण्याच्या पद्धतीतच होत आहे. त्यातहि अमुक फॅशन म्हणजे आधुनिकता आणि तमुक म्हणजे जुनाटपणा, हे ठरविता येणे कठीण आहे. कारण इतिहासाची पुनरावृत्ति होते म्हणतात, त्याप्रमाणेच कित्येक वेषभूषापद्धतींचे पुनरावर्तन चालू असते हे आपण नेहमी पाहतोंच. पूर्वी खणाच्या चोळ्या घालीत असत. आजही इतकी वर्षे बाद ठरलेले धारवाडी खण भाव खाऊं लागलेले आहेत. फॅशन कोणतीहि असो, जिला जी फॅशन शोभेल आणि ती सभ्यतेला अनुसरून असेल तर करावयाला वास्तविक प्रत्यवाय असण्याचे काहीच कारण नाही. आतां सभ्यतेची मर्यादा कोणती, याचाहि वादातीत निर्णय घेणे कठीण आहे. जी गोष्ट माझ्या सभ्यतेच्या व्याख्येत बसेल तीच गोष्ट एखाद्याला वाह्यात-पणाची वाटणें अगदीं शक्य आहे; किंवा आणखी एखाद्याला अगदींच

मागासलेली वाटण्याचाहि संभव आहे. पण असें जरी असलें तरी त्या त्या काळाला आणि परिस्थितीला अनुसरून सभ्यतेचे कांहीं ठोकळ नियम आपोआप बनत असतात. आणि अगदीं बारीक गोष्टींचा कीस काढीत न बसतां आपल्याला ठोकळ मानानें कबूल करावें लागेल कीं जीवनात आनंद निर्माण करणे, मनाची हौस पुरविणें यासाठीं नवनवीन पोषाखाच्या पद्धती रूढ करणें आवश्यकहि आहे. शिवाय माणूस हा प्राणी असा आहे कीं एकच एक गोष्ट त्याला कंटाळवाणी वाटते. नाना तऱ्हा करून तो आयुष्याला रजकता आणीत असतो. तेव्हा या सौंदर्याच्या व नाविन्याच्या दृष्टीने विचार करता, पोषाखाचा बदल आवश्यक नाहीं, असें म्हणतां येणार नाही.

पण हे कबूल करून देखील असें म्हणावेंसे वाटते कीं केवळ वरवरचें नाविन्य ही सुधारणा नव्हे. विहिरीचें पाणी पिण्यायोग्य करावयाचें असेल तर ते वरवर ढवळून त्याची अशुद्धता जाणार नाही; त्याच्या मुळांतला गाळ उपसून काढला पाहिजे. पण विहीरीत घाण आहे, आणि ती काढणे आवश्यक आहे, ती काढली नाही तर पाण्याला दुर्गंधी सुटेल ही गोष्टच आम्हा स्त्रियाना अजून पटलेली नाहीं, किंवा आमच्या ध्यानांत आलेली नाहीं. कारण आजवर स्त्रियांच्या उन्नतीची बहुतेक सारी धडपड पुरुषांनीच केलेली आहे. "तुम्ही अज्ञानांत आहांत, तुमचे आयुष्य विनाकारण दुःखांत जात आहे, कित्येक रूढींनी तुमच्यावर अन्याय केला आहे नि त्यामुळे तुमची योग्यता केवळ मातीमोल होऊन बसली आहे" या सर्व गोष्टी पुरुषांनीच आमच्या कांनी कपाळी ओरडून सांगितल्या, अजूनहि सांगत आहेत. पण गंमत अशी की अजूनहि हें आम्हाला खरें वाटत नाही! आम्ही अज्ञानांत आहोत हें ज्ञानच आम्हांला झालेलें नाहीं. खरोखरी कोणत्या दुःखाने आम्ही चिंबून गेलों आहोंत, कोणत्या अन्यायानें आमच्या आयुष्याला संकुचितपणा आला आहे, आणि हजारों वर्षांच्या कोणत्या संस्कारांनी आमच्या सुखाचे, उन्नतीचे दरवाजे बंद झाले आहेत हें आम्हांला समजलेले नाही. त्यामुळें 'ठोठावा म्हणजे दार उघडेल' हें सुभाषित आज फक्त आमच्या कानांवरून जातें. त्याचा अर्थ मात्र त्या वाक्यांतच राहतो.

पुष्कळशा स्त्रियांची स्थिति वर म्हटल्याप्रमाणेंच आहे. त्यांच्या सुधारणेची उडी फार तर बॅडमिंग्टन खेळण्याच्या कोर्टापर्यंत जाते. आयुष्याची कोंडी

सोडवावयाला केवळ बॅडमिंग्टनचें कोर्ट पुरें पडणार नाही; तर त्यासाठीं जीवनाच्या मोठ्या क्षेत्रांत धीटपणानें वावरावयाला शिकणें जरूर आहे. या गोष्टीची जाणीवच अजून आम्हांला झाली नाहीं. पण खेळासारख्या किरकोळ सुधारणांनी का आमचे प्रश्न, सुटणार आहेत ? आमचा आर्थिक प्रश्न, आमचे विवाहविषयक प्रश्न, आमचे व्यक्तिस्वातंत्र्य, आमचा वैयक्तिक विकास, आमचे सांसारिक जीवन, आमच्या ध्येयाची दिशा, पुनर्विवाह, घटस्फोट अशा नाना तऱ्हेच्या कोडयांनीं आमचे जीवन आजच्या अस्थिर बिकट परिस्थितीत चक्रव्यूहात सांपडल्यासारखे झालें आहे. याचा विचार कोणी करावयाचा ? केवळ पुरुषांनीच ? नसता संकोच आणि भीतीचें बुजगावणें बाजूला ठेवून स्त्रीजीवन-विषयक प्रश्नांचा विचार आमचा आम्हीच करण्याची वेळ अजूनसुद्धा आली नाही काय ?

ही वेळ आल्याची दाद कित्येक स्त्रियांना नाहीं हे जितकें खरें तितकेंच हेंही खरें की, या प्रश्नाचा काहीतरी विचार व्हायला हवा आहे, निदान आपल्यापेक्षा दुसऱ्या कोणी केला तर बरा, असें अंधुक, अस्पष्ट, तरंगत्या स्वप्नासारखे विचार ज्याच्या डोक्यात येऊ लागले आहेत असाहि एक स्त्रियाचा वर्ग आहे. मात्र, ते विचार प्रत्यक्ष आचरणांत आणणें तर जाऊ-द्याच, पण त्याचा नुसता उच्चार करण्याची सुद्धां कित्येकींना भीति वाटत असते. जें आजपर्यंत कधी केले नाही, जे घडलें नाहीं, पाहिलें तर नाहीच पण ऐकलेंसुद्धा नाही, त्या गोष्टी करणें......छे छे ! कुणी तरी शासनकर्ता हातांत वेताची छडी उगारून समोर उभा असावा, नि धास्तीने जीव गुदमरून अंगावर रोमांच उभे रहावेत तशी आम्हां स्त्रियांची अवस्था होते ! ‘ लोक काय म्हणतील !’ या सर्वांत मोठया भीतीची आमच्या स्त्रीमनावर इतकी जबरदस्त मगरमिठी असते कीं कोणी सोडवावयाला आलें तरी आम्ही म्हणतो “ नको रे बाबा ! लोक काय म्हणतील ? त्यापेक्षां यांतच आम्ही मेलों तरी चालेल.” आमचीं मनेंच इतकी धास्तावून गेलेलीं आहेत की स्वतंत्रता कोणी आपण होऊन बहाल केली तरी ती उपभोगण्याचे धैर्य आमच्यात नाहीं. थोडें रूढीविरूद्ध, नेहमींच्या साच्याबाहेरचें दृश्य पाहिलें कीं लगेच आमच्या मनांत चलबिचल होते. मनाला तो नवीनपणा झेंपत नाहीं. परावलंबनांतच सुख मानण्याची, दुसऱ्याच्या ताटाखालचें मांजर

होऊन रहाण्याचीच आम्हांला इतकी वर्षे संवय झाली आहे कीं थोडया मोकळ्या हवेत येताच ते वारे आमच्या मनाला जणुं झोंबूं लागतें आणि कित्येक गोष्टीत आपले पाऊल फार मागे आहे हे मनाला पटत असूनही केवळ लोक काय म्हणतील या भीतीने, व आत्मविश्वासाच्या अभावी आमचीं पावलें जाग्यावरून उचलायला धजतच नाहीत. भीतीच्या दडपणाने आमच्या विचारांना मुंग्या आल्यासारखे होते आणि विचार करणारे मन जणुं भारावून जातें. या भीतीने आम्हांला इतके ग्रासून टाकले आहे की आम्ही वाटेल ते अन्याय सहन करीत असतो. आमच्यापैकी कित्येकींची आयुष्ये म्हणजे जळती आग असते. कित्येकींची आयुष्ये केवळ दुसऱ्याच्या खस्ता खाण्यांतच खर्ची पडत असतात. जगात दुःखाबरोबर सुखोपभोगहि आहेत नि त्याचाहि आपल्याला लाभ झालाच पाहिजे, एवढी नुसती इच्छाहि बाळगतां येणार नाही, असले रुक्ष, कंटाळवाणे, भकास जीवन कित्येकींच्या वांट्याला आलेले असते. पण ही परिस्थिति बदलली पाहिजे, याचा नुसता विचार करावयालाहि आम्ही धजत नाही. पण आम्ही अशाच मागे मागे राहिलो तर आमच्याच मुलींना हे प्रश्न उद्यां भेडावून सोडतील, या गोष्टीची आम्ही दखल घेतली पाहिजे. पण सर्व दृष्टींनी सामर्थ्यसपन्न स्त्री म्हणून जगण्याचे दिव्य करण्यापेक्षां दुबळेपणाने "आम्ही आपल्या राजाच्या राण्या आहोत" अशी स्वतःच्या मनाची आणि इतराचीही खोटीच समजूत करण्याचा आम्ही प्रयत्न करतो!

ही झाली संस्काराच्या ओझ्यांनी दडपून, वाकून गेलेल्या स्त्रियांच्या मनाची गोष्ट! त्या निदान दुसऱ्यांच्या मार्गात तरी आड येत नाहीत. पण स्त्रीसमाजात असा एक फार मोठा वर्ग आहे की त्या वर्गातील स्त्रिया स्वतः तर काहीच करणार नाहीत, पण दुसऱ्यांनी केलेल्या गोष्टींची नालस्ती मात्र करतील. चागल्या गोष्टींना विपरीत स्वरूप देणे, हा रेशनचे तादूळ निवडताना बोलण्याचा त्यांचा खास आवडीचा विषय असतो. हे वाचून कदाचित् कांहीं वाचकभगिनींना राग येईल. पण प्रामणिकपणें विचार केला तर, स्त्रियांच्या मार्गांत स्त्रियाच जेवढ्या आड येतात, एकमेकींचा सूड उगवतात, मत्सर करतात, अनुदारपणाने वागवतात आणि टोचा मारून दुखवतात, तेवढे पुरुष अनुदारपणाने वागत नाहीत असें म्हणावे लागेल.

संबंध पुरुषजातीला औदार्याचें सर्टिफिकेट देण्याचा हा प्रश्न नाही. पण मुद्दा हा आहे कीं स्त्रीला सहानुभूति दाखविण्याचें कार्य स्त्रीकडून अगोदर व्हावयास पाहिजे. कारण स्त्रीचें अंतःकरण पूर्णपणे ओळखणे स्त्रीलाच शक्य असतें. पण बहुधा असें होत नाहीं. विधवा मुलीनें कुंकू लावलें तर त्या कुंकवाचा परीघ मोजायला स्त्रिया दहा वेळां निघतील. पुनर्विवाहित बाईनें नवी नथ घेतली तर इतर स्त्रिया नाकें मुरडल्याशिवाय राहणार नाहींत. एखादी मुलगी भोळेपणानें कुठें फसली तर तिला कायमची जगातून उठवायला स्त्रीच अगोदर पुढें येईल. त्यावेळीं तिला विवेक राहणार नाहीं कीं, हाच प्रसंग आपल्या बहिणीवर, किंवा खुद्द आपल्यावरच आला असता तर आपली काय दशा झाली असती? स्वतः प्रेमविवाह करणारी मुलगी दुसरीच्या प्रेमविवाहाबद्दल सहानुभूतीनें बोलेल ही शाश्वति नाहीं. तिला ती बडखोर म्हणायला कमी करणार नाहीं. त्यातूनहि कांही बोललीच तर अशा थाटांत बोलेल कीं तिचा स्वतःचा प्रेमसंबंध हाच तेवढा नीतिशास्त्राच्या साच्यांत बसणारा होता, पण बाकीचे प्रेमसंबंध हे मात्र केवळ विकारवशतेचे नमुने आहेत. अशाहि कांही स्त्रिया आपणांस दिसतात कीं पूर्वजीवनांत स्वतः पाय घसरून पडलेल्या असूनमुद्धा संसारांत पडल्यानंतर मात्र त्रेतायुगातल्या सीतासावित्रीचा आव आणून आपल्या तरुण विधवा जावेला किंवा नणंदेला नीतिशास्त्राचे पाठ द्यायला त्या कमी करीत नाहींत. मला वाटतें, हें वैगुण्य स्त्रियांच्यांत फार मोठ्या प्रमाणांत आहे. माणूस दुसऱ्याचे दोष ज्या कठोरपणानें पाहू शकतो, तीच कठोरता त्यानें स्वतःला लावून, आपल्या कृति बरोबर आहेत कीं चूक आहेत, याचा निर्णय घेतला पाहिजे. माणूस स्वतःच्या गुणावगुणांची छाननी करूं लागला, स्वतःचे दोष समजून घेऊं लागला कीं त्याच्या सुधारणेचा आरंभ झाला असें समजावयाला हरकत नाहीं. प्रत्येक स्त्रीनें हें ध्यानांत घेतलें पाहिजे कीं सुख मिळविण्याचा, मग तो पुरुष असो किंवा स्त्री असो, प्रत्येक व्यक्तीला हक्क आहे. जगांतील लहान सहान गोष्टी, मोठमोठ्या घडा-मोडी, महान् क्रान्त्या, युद्धें या सर्व गोष्टींचें चक्र, माणसानें स्वातंत्र्य उपभोगावें, आयुष्यांत सुखी व्हावें, जीवनांत समाधान मिळवावें या एकाच हेतूभोंवती फिरत असतें. जगांतील सर्व लोकांच्या सुखदुःखाची जबाबदारी

कोणा एकट्यावर नाहीं. आणि कोणत्याहि एका व्यक्तीची तेवढी ताकदच नाहीं. पण प्रगतिपथावर पुढें जाणाऱ्या स्त्रीला उत्तेजन देणें, तिचें कौतुक करणें, पडलेल्या स्त्रीला उदारपणानें उठवून उभी करणें, दुर्दैवाच्या फेऱ्यांत जन्म काढणाऱ्या स्त्रियांची नुसती कींव करून मोठेपणा मिरवण्यापेक्षा त्याना शक्य तो सहाय्य करणें, आणि एकंदरीत संकुचित वृत्ति टाकून स्त्रीजीवनाचे प्रश्न उदार मनानें सोडविणें, ही स्त्रीची सर्वांत मोठी आणि पहिली सुधारणा होणें अवश्य आहे. आणि याचसाठीं दुसऱ्याची बाजू समजावून घेण्याची सवय आपल्या मनाला लावली पाहिजे. ही सवय नसते म्हणून कित्येक दुःखी कष्टी जीवाना आम्ही आणखीच अन्याय करीत असतो. पण दुसऱ्याच्या अपराधाचें माप त्याच्या पदरात टाकण्याचा, आयुष्यातून त्याला कायमचा उठविण्याचा अधिकार जगात अशा किती लोकाना असेल की ज्यांच्या आयुष्यांत न कळत का होईना, पण एकहि चूक झाली नाही? मला वाटतें, प्रत्येकानें या प्रश्नाचें उत्तर प्रामाणिकपणानें देण्याचें ठरविले तर...तर ज्यांचे गुन्हे जगासमोर आले नाहीत अशा प्रतिष्ठित माणसांवर कदाचित् आपापल्या जागा भराभर खाली करण्याचा अनवस्था प्रसंग ओढवणें अगदींच अशक्य नाहीं.

आम्ही स्त्रिया अशा संकुचित वृत्तीच्या आहोत ही काहीं केवळ आमचीच चूक नाही. आज शेकडों वर्षं स्त्री ही जवळ जवळ गोषांतच रहात आलेली आहे, असें म्हटलें तर फारसे चूक होणार नाहीं. गोषा याचा अर्थ कापडाचा बुरखा असाच केवळ नव्हे, तर वैचारिक दृष्ट्या, जगांतील नाना अनुभवाच्या तुलनेनें स्त्रीचे जग केवळ चार भिंतीच्या पलीकडे गेलेलेच नाहीं. ती आतांशीं कोठें दार किलकिलें करून पाहूं लागली आहे. आणि चार दिवसाच्या तान्ह्या मुलानें डोळे उघडतांच प्रकाशाचा झोत सहन न होऊन घाबरून डोळे मिटावेत, अंगावर शहारे येऊन हातपाय पोटाशी घ्यावेत, तशी आमची सध्यां स्थिति झाली आहे. अधून मधून, आम्हांला घराच्याबाहेरचे जग समजावें, त्या जगांत आम्हांला स्थान असावें, असे खोल खोल कुठेतरी वाटत असतें. पण ही मतामतांची भाऊगर्दी, त्या गर्दींतून आपला मार्ग शोधण्यासाठीं करावी लागणारी धांवपळ, आणि या धांवपळींत कुणाचा धक्का लागून पडलो तर लोक

काय म्हणतील ही धास्ती, यानें आमचा जीव निम्मा हैराण होत असतो. हा कांहीं आमचा दोष नाही. इतकी वर्षे आम्हीं निर्जीव गोळ्याप्रमाणे पडून होतो. आतांच कुठें पाय हलवावेसे वाटूं लागलें आहे, तर एकदम आम्हीं जीवनाच्या पटांगणांत पुरुषांच्या बरोबरीनें धांवपळ करण्यांत समर्थ व्हावे, अशी जर कोणी अपेक्षा केली तर ती चूक ठरणार नाहीं काय? प्रगतीची एकेक पायरी चढता चढतांच आम्हा वर येऊ. आणि त्याची लाज वाटण्याचे तरी काय कारण आहे?

ज्या तऱ्हेचें स्त्रीजीवन बनविण्याची आपली इच्छा आहे, आपली अपेक्षा आहे, तसें ते बनाविण्याचें धैर्य आमच्या अंगी येणे जरूर आहे. आपली प्रामाणिक मते बोलून दाखविताना आम्ही स्त्रियांनी यापुढे कचरता कामा नये. आणि जीवनाच्या धकाधकीत वेळ आली म्हणजे कोणत्याहि प्रसंगातून निभावून जाण्याचे धैर्यहि आम्ही दाखविलें पाहिजे. ते धैर्य आम्ही दाखवीत नाहीं म्हणून अर्धवटपणाचा आरोप आमच्यावर येतो. बाधलेली शिदोरी आणि उसनी अक्कल किती दिवस पुरणार! स्त्री ही स्वतःच कणखर बनून जीवनाच्या धकाधकींत आपला वाटा छातीठोकपणे आणि हसतमुखानें उचलून वाट चालू लागेल तर कुणीहि तिची वाट अडवूं शकणार नाहीं. स्वातंत्र्य मिळवायला कोणाची परवानगी घ्यावी लागत नाहीं. स्वतःचा झगडा स्वतः झगडणे, स्वतःचे लढे स्वतःच लढविणे, म्हणजेच पर्यायानें आपल्या प्रश्नाची दाद स्वावलंबनानें लावून घेणे, हा कोणत्याही राष्ट्रानें, कोणत्याही समाजानें आणि कोणत्याही व्यक्तीनें गिरवावयाचा पहिला धडा असावा लागतो. परावलंबन म्हणजे सर्वनाश, ही जाणीव आजच्या स्त्रीला असणें अत्यंत जरूर आहे. परावलंबनाची खंत ज्याना नाहीं, आणि दुसऱ्यानें ढकलल्याशिवाय ज्यांचा पांगुळगाडा चालतच नाहीं, त्यानाच अन्याय सहन करावे लागतात ही गोष्ट इतिहासाने पूर्णपणे सिद्ध केलेली आहे, आजही सिद्ध होत आहे. मग या गोष्टीकडे स्त्रियांनी तरी डोळेझांक करून कसे चालेल? जो निर्भयपणे मोठ्याने गर्जना करून उडी घेतो तोच खेळ जिंकतो, ही जगाची रीत आहे. ती आम्ही उपेक्षिली म्हणून जग एकीकडे आणि आम्ही भलतीकडे अशी आमची स्थिति झाली आहे.

माझ्या या सर्व म्हणण्याचा अर्थ एवढाच कीं जेव्हां तेव्हा पुरुषांच्या

आणि समाजाच्या डोक्यावर आपल्या दुःखाचे खापर फोडून आम्ही मोकळ्या होतो—आणि कधीं कधीं हें खरेंहि असते—पण तसें करतांना, आमचें दुःखनिवारण प्रत्यक्ष आपण स्वतः हातपाय हालवून न करतां, ती खटपट दुसऱ्याच कोणी करावी ही आमची अपेक्षा असते. जन्मभर ही दुसऱ्याकडून भरवून घेण्याची आमची संवय चांगली नाही. आम्ही कांहीच करावयाचें नाही तर लोकांनी तरी आम्हांला किती दिवस बोटाला धरून चालवावें ? आम्हाला समान हक्क हवेत म्हणून आम्ही म्हणतों, पण ट्रॅममध्यें, आगगाडीत जागा मिळवण्यासारख्या क्षुल्लक गोष्टींतहि पुरुषांनी आपली जागा रिकामी करून आम्हांला स्त्रीदाक्षिण्य दाखवावें अशी आमची अपेक्षा असते ! ही अपेक्षा चुकीची नाही काय ? यापुढे आम्हांला जगाच्या धकाधकींत स्वाभिमानानें जगावयाचें आहे. आजपर्यंत स्त्रीने पुष्कळ सहन केलें. आपल्या कुटुंबाच्या सुखाकरतां फार मोठा त्याग केला; पण दुर्दैवानें त्या त्यागाला किंमत आली नाही; त्याचें महत्त्व समाज ओळखूं शकला नाही. कारण स्त्रीनें स्वार्थत्याग करणें ही गोष्ट स्वतः तिच्या आणि समाजाच्यासुद्धां इतकी आंगवळणी पडून गेली कीं, स्वतःसाठीं धडपड करणें हें खुद्द स्त्रीलाच आणि समाजालाहि अनैसर्गिक वाटूं लागलें ! त्यामुळे स्त्रीचें स्वत्व मेलें. तिला स्वतंत्र अस्तित्व असूं शकेल याचाच तिच्यासकट साऱ्यांना विसर पडला. आणि स्त्रीची नेमकी इथेंच चूक झाली. आपलें व्यक्तिमत्व, आणि आपलें सामर्थ्य सिद्ध करण्यापूर्वींच ती त्यागाच्या भानगडींत पडली. दुबळ्या माणसाच्या स्वार्थत्यागाला व्यवहारी जगाकडून कधीतरी किंमत मिळत असते का ? धनवान् माणसानें एखाद्या संस्थेला दहा लाखांची देणगी जाहीर केली तर त्याचा सत्कार होणें साहजिकच आहे. पण लढाईत मारल्या जाणाऱ्या शिपायाचें प्रेतसुद्धां कोणी शोधीत नाही, हें सत्य डोळ्याआड करतां येईल का ? त्याच्या देशभक्तीचा चुकून माकून देखील उच्चार होत नाही, मग तो कितीही देशभक्त असो, देशासाठी त्याने स्वतःच्या कुटुंबाचा नाश उघड्या डोळ्यांनी सहन केलेला असो, त्याच्या देशभक्तीची किंमत—भिकाऱ्यानें राज्याचें दान करावें तशी होते !

बायकांची एक जुनी म्हण आहे कीं ‘ शेळी जाते जीवानिशी, आणि

खाणारा म्हणतो वातड किती ! ' स्त्रीची अवहेलना आजपर्यंत अशी होत आली आहे. स्त्रीनें अनंत काळ त्याग केला, पण स्वतः दुबळी असतांना केला. म्हणून त्याचे चीज झालें नाहीं. स्त्रीनें अगोदर आपलें व्यक्तिमत्व, आपलें कर्तृत्व पटवून द्यायला हवें. मग तिच्या स्वार्थत्यागाची किंमत आपो-आपच वाढेल. उदाहरणादाखल सांगते की, एका घरांत दोन सुना आहेत. एक कोकणांतील अशिक्षित आहे आणि एक शहरांतील पदवीधर आहे. गृहकृत्ये करण्याच्या दृष्टीनें विचार केला तर कोकणातील मुलगी त्या बाब-तीत सरस ठरेल. पण ही अशिक्षित मुलगी दिवसभर घरात राबली तर तिचें कौतुक होणार नाहीं. एवढें कौतुक पदवीधर मुलीनें नुसतीं चार कामें केल्यानें होईल. कारण ह्या पदवीधर मुलीने, आपलें शहाणपण नुसतें चुली-पुरतें नाहीं, तर आणखीहि कांही विषय आपणाला कळूं शकतात, हे दाख-वून सिद्ध केलेलें आहे. म्हणून मी म्हणते की ज्या वेळीं स्त्री स्वतःचा झगडा स्वतः झगडूं लागेल, आपलें वकीलपत्र घेऊन स्वतःच बोलूं लागेल, आणि न्याय मिळवण्याचा हक्क बजावूं लागेल त्यावेळीं समाजालासुद्धा तिच्या म्हण-ण्याचा विचार करावा लागेल. तिची कैफीयत म्हणजे लहान मुलांचें रडणें आहे, अशी उपेक्षा करून त्याला भागणार नाहीं. आणि न्यायाचें माप तिच्या स्वाधीन करण्याची त्यालाच जरूरी वाटूं लागेल.

मी इतक्या आग्रहानें लिहीत आहे याचा अर्थ समान हक्काची माझी व्याख्या, प्रत्येक गोष्ट पुरुषाप्रमाणेच आली पाहिजे, अशा दुराग्रहाची नाहीं. उलट स्त्रीच्या मनाची व शरीराची ठेवण, आणि निसर्गानें तिच्यावर टाकलेली पुरुषांहून निराळी अशी अपत्यजननाची न टाळतां येण्यासारखी जबाबदारी, एवढ्या एका गोष्टीमुळें स्त्री ही लगेच पुरुषाहून कमी दर्जाची ठरते, असे पुरुषांना अगर स्त्रियांनाहि समजण्याचें मुळींच कारण नाहीं. पुरुष हा जसा आयुष्यांत बाणेदारपणानें जगूं इच्छितो, धडपड करतो, त्याच तेजस्वीपणानें जगण्याचा हक्क स्त्रीलाहि कां असूं नये, एवढेंच माझें म्हणणें उलट स्त्री निसर्गाची अधिक बांधील असल्यामुळें पुरुषां-पेक्षांहि तिला या सवलती अधिक मिळावयास हव्यात. घटकाभर असें धरून चालूंया कीं, अपत्यजननाची जबाबदारी आलटून पालटून एकदां स्त्रीवर व एकदा पुरुषावर पडली तर स्त्रियात व पुरुषांत खरोखरी कोणत्या कर्तृत्वाचा

फरक रहाणार आहे? तेव्हां अपत्य-सृजनाची जबाबदारी पुरुषावर नाहीं म्हणून पुरुषांनी शेफारून जाण्याचें किंवा स्त्रियांनी कमीपणा मानण्याचें मुळींच कारण नाहीं. स्त्री ही केवळ स्त्री म्हणून उपेक्षिली जाता कामा नये हे जेवढें खरें, तेवढेंच स्त्रीला सांभाळाव्या लागणाऱ्या सांसारिक जबाबदाऱ्या म्हणजे कमीपणा ही न्यूनगंडात्मक भावना स्त्रियांनी अगोदर टाकून दिली पाहिजे. ससारांतील अमुक कार्य स्त्रीचें आणि अमुक कार्य पुरुषाचें, यांत वास्तविक श्रेष्ठ-कनिष्ठ प्रतीचा प्रश्न नसून स्त्री-पुरुषांतील नैसर्गिक फरकामुळेच त्या त्या जबाबदाऱ्या ज्याच्या त्याच्या अंगावर पडल्या आहेत—त्या त्या सांभाळून कालमानाप्रमाणे ज्या नव्या गोष्टी स्त्रीला अंगीकारणें प्राप्त झाले आहे त्या करण्याची तिने तयारी दाखविली पाहिजे. त्या दृष्टीने कोळी समाजातील स्त्रिया खऱ्या आधुनिक आहेत असे आपल्याला कबूल करावें लागेल. त्यांचा पोषाख आम्हा पांढरपेशा स्त्रियांपेक्षा जुन्या पद्धतीचा असेल किंवा इंग्रजी भाषा त्या बोलू शकत नसतील, पण सर्व दृष्टींनी त्या स्वतंत्र आहेत. त्या स्वतः मिळवत्या तर आहेतच; पण प्रसंग आला तर देवाचा धावा न करतां त्या एक दोन पुरुषांचाहि प्रतिकार करून विजयी होतील, असली सुदृढ शरीरप्रकृति आणि असलें मानसिक सामर्थ्य त्यांनी कमावून ठेवलेलें आहे.

अशा प्रकारचें स्वावलंबन स्त्रियांत यायला हवें असें आम्ही म्हणतो, तेव्हां 'स्त्रिया या पुरुषी वळणाच्या होतील' असेंहि कित्येक स्त्रीपुरुषांना वाटत असतें. स्त्रियांनाच असें वाटतें तेव्हां तो त्यांच्या मनाचा कमकुवतपणा, आकुंचितपणा आणि आत्मविश्वासाचा अभाव आहे असें म्हणणे भाग आहे. आमचा हा कमकुवतपणा ओळखून स्त्रियांना कायमच्या अज्ञानांतच ठेव-ण्याची ज्यांची इच्छा आहे, स्त्रिया पुरुषांच्या बरोबरीनें आपले हक्क सांभाळून जगूं लागल्या तर डोईजड होतील अशी ज्यांना भीति वाटते, ते लोकच 'स्त्री ही जागी होऊन हक्कासाठीं भांडूं लागली तर ती पुरुषी वळणावर जाईल,' अशा भीतीचा बागुलबुवा निर्माण करतात. पण या बुजगावण्याला आपण आतां किती दिवस भ्यावयाचें? स्त्रीवर निसर्गानें टाकलेली जबाबदारी लक्ष्यांत घेऊनहि असें म्हणणे जरूर आहे कीं स्त्री ही एक स्वतंत्र अस्तित्व असणारी, स्वतंत्र विचार आणि भावना असणारी, पुरुषाप्रमाणेंच हाड-

मांसाची माणूस आहे, या गोष्टीकडे बुद्धिपुरस्सर दुर्लक्ष करून चालणार नाही. आणि म्हणून तिलाही न्याय्य हक्क मिळावयास हवेतच आहेत. ते पुरुषांच्या मदतीने कां होईनात, पण आमच्या धडपडीने आम्ही ते मिळवावयाला हवेत. तरच ते आम्हांला यशस्वीपणें उपभोगतां येतील. नाहींतर बावळटपणाचा शिक्का आमच्या माथीं बसून, ज्याना स्त्रिया ह्या केवळ उपभोग्य वस्तु वाटतात, स्त्रिया या नवऱ्यांची केवळ शोभा असे जे समजतात, त्याच्या म्हणण्याला विनाकारण बळकटी येईल. असे म्हणतात की राज्य मिळविण्यापेक्षां टिकवणें अधिक अवघड आहे. एवढ्यासाठी आमची पात्रता आम्ही सिद्ध करून दाखविली पाहिजे. दुसऱ्यावर विसंबून राहण्याची संवय टाकून दिली पाहिजे. कोणत्या गोष्टीची आमच्या जीवनांत जरूरी आहे याचा विचार आणि प्रत्यक्ष आचरण करण्याइतपत आमच्या मनाची आणि बुद्धीची तयारी व्हावयास पाहिजे. ही पात्रता एकदा सिद्ध झाली म्हणजे सिद्ध झालेल्या गोष्टी कोणालाहि नाकारतां येणार नाहीत. कारण तशी पात्रता सिद्ध करणाऱ्या माणसाची बाजू सत्याधिष्ठित असते—आणि स्वसामर्थ्याच्या आत्मविश्वासाने त्याला बळकटी आलेली असते.



# नवा दृष्टिकोन : : २

स्त्रियांचे आर्थिक स्वावलंबन या विषयावर पुष्कळ वादविवाद आणि चर्चा झालेली आहे. अशा चर्चेतून स्त्रियानी आर्थिक दृष्ट्या स्वावलंबी असणे जरूर आहे असाहि निष्कर्ष पुष्कळ वेळां निघालेला आहे. पण समाजांत अशी पुष्कळ माणसे आहेत की त्याना स्त्रियांचे आर्थिक स्वावलंबन हा विषय सद्यः परिस्थितीनुरूपहि जिव्हाळ्याचा, महत्त्वाचा न वाटता उपेक्षेचाच वाटतो. स्त्री ही बुद्धीने, कर्तृत्वाने कशीहि थोर असली तरी शेवटी चूल आणि मूल या पलिकडे डोकावून पहाण्याचे तिला काहीएक कारण नाही, अशी विचार-सरणी अजून बऱ्याच जणांच्या डोक्यांत ठाण मांडून बसलेली आहे. त्यामुळें कित्येक पालकांचा मुलींच्या शिक्षणावर पाहिजे तसा भर नसतो. सामान्य स्त्रीपुरुषांच्या आयुष्याची सफलता संसार नीटनेटका करणे हीच असते हे खरं आहे. आर्थिक मदत ही पुरुषाची संसारिक कामगिरी व कुटुंबातील माण-सांशी सहकार्य व मुलांचे संगोपन ही स्त्रियांची सांसारिक कामगिरी होय, हे नैसर्गिकच आहे. पण आजच्या धकाधकीच्या काळांत पुरुषावरच आर्थिक मिळकतीचा भर देऊन भागत नाही व प्रसंगी मुलींचे ‘ चूल–मूल ’ पुरतेच शिक्षण अगदी कमी पडते, ही गोष्ट ध्यानात न घेता मुलीने आर्थिक गोष्टीत मन घालण्याचे कारण नाही असे आपण म्हणतो. अशा विचारसरणीमुळे मुलीच्या बुद्धीचा अदमास घेऊन तिच्या शिक्षणाला महत्त्व न देतां लग्न होईपर्यंत मुलीने घरात बसून काय करावयाचे, त्यापेक्षा ती शाळेत गेलेली बरी, अशा विचाराने बहुतेक मुली शाळा–कॉलेजांत पाठविल्या जात अस-तात. पूर्वीसारखी लौकर लग्न करण्याची पद्धत आजहि असती तर आजच्या सर्वच मुली शिकत राहिल्या असत्या की नाही याची शंकाच आहे. कारण मुलींचे लग्न होण्यापूर्वी संसार करण्यास अनेक तऱ्हांनी ती कार्यक्षम असावयास पाहिजे ही गोष्ट आम्हास अजून पटलेली नाही. पण ज्या पालकांना आपल्या

मुलींचीं लग्नें लौकर उरकून टाकण्याची घाई असते त्यानामुद्धां लौकर बाशिंग बांधून घेणारे नवरदेव भेटत नसल्याने आपल्या मुलींना नाइलाजाने शाळेंत पाठवावे लागत आहे. पुरुषांचीहि आर्थिक परिस्थिति अशा कुचंबणेची आहे की इच्छा असूनहि ते आर्थिक स्थैर्य आल्याशिवाय लग्नास तयार होत नाहीत. त्यामुळे साहजिकच मुलींची वयें वाढतात, आणि शाळा कॉलेजांत त्यांची गर्दी होते. मुलींच्या शिक्षणाची बव्हंशी ही अशी कारणपरंपरा असते. स्त्रीशिक्षणाचें महत्त्व जाणून आपल्या मुलींना नाना तऱ्हांनी सुशिक्षित करणारे कांहीं पालक असतीलहि; पण बहुजनसमाजाची स्त्रीशिक्षणाची कल्पना मुलींना कार्यक्षम करण्याची नाहीं. हें आम्ही मुद्दामच करतो असें नव्हे; तर या गोष्टीचे महत्त्वच आम्हाला पटलेले नाहीं. मुलगी बी. ए. नव्हे अगदी एम्. ए. झाली तरी अखेर चूल आणि मूल ह्यांतच तिचा जन्म, अशीच सर्वत्र समजूत आहे. पण चूल व मूल संभाळण्यासाठी सुद्धां स्त्री आहे त्यापेक्षा कितीतरी पटींनें अधिक कार्यक्षम होण्याची जरूरी आहे, ही गोष्ट आम्हांला माहीतच नसल्याने आम्ही मुलींच्या शिक्षणाकडे दुर्लक्ष करतों.

मुलींच्या शिक्षणासंबंधीं, म्हणजे पर्यायाने मुली स्वावलंबी असाव्यात—असणे जरूर आहे—या गोष्टीचे महत्वच आम्हांला वाटत नसल्यामुळें, जीवनाच्या धकाधकीत मुलाप्रमाणेंच मुलगी स्वावलंबनाने टिकाव धरून रहावी, आपल्या प्रश्नांचा विचार तिने स्वतःच्या डोक्याने करावा, आणि आपला मार्ग धीराने चालण्याइतकी तिला कार्यक्षम करावी, असा प्रयत्न करण्याची पालकांना कधी गरज वाटलीच नाहीं. कारण आजपर्यंत मुलींच्या आयुष्याची इतिकर्तव्यता परावलंबनांतच आहे ही भावना आमच्या मनाशी, विचाराशी इतकी एकजीव झालेली आहे की, ते परावलंबन आहे हे सुद्धां आम्हांला समजत नाही. ‘लहानपणीं आईवडिलांच्या ताब्यात, तरुणपणी नवऱ्याच्या हुकुमांत आणि म्हातारपणी मुलांच्या पांजरपोळात’ ही स्त्रियांच्या आयुष्याची सुटसुटीत आणि सोपी घडामोड आहे. याच एका मार्गानें लाखो स्त्रिया गेल्या आणि जात आहेत. स्त्रीला आईबापांचे, नवऱ्याचें व मुलांबाळांचें बंधनच नको असें माझे मुळींच म्हणणें नाहीं. तसा गैरसमज कोणी करून घेऊं नये. समाजांत राहणाऱ्या प्रत्येक व्यक्तीला बंधनाची अवश्य जरूरी आहे. पण तीं बंधने अशी असावीत की व्यक्तीचें, मग ती पुरुष असो अगर स्त्री असो, व्यक्तिमत्व

शिल्लक राहिले पाहिजे, तिच्या व्यक्तित्वाचा विकास झाला पाहिजे; व्यक्तीचें अस्तित्वच नष्ट होतां कामा नये. आत्यंतिक बंधनांनीं माणूस जखडून गेला म्हणजे त्याचे माणूसपण नाहीसें होतें आणि बंधनें म्हणजेच माणूस असें होऊन बसते. माणसाचे यंत्र झाल्यासारखें होतें. एखादे यंत्र सुरू करून द्यावें कीं तें आपले काम करीत राहते. पण ते बंद पडले की त्याला दुसऱ्या कुणीतरी गति दिल्याशिवाय ते चालूच होत नाही, तसे स्त्रियांच्या जीवनाचे झाले आहे. स्त्रियांना स्वतंत्र अस्तित्व असावे, पुरुषाप्रमाणेच त्यांनाहि कांही व्यक्तिमत्व असते, असणे जरूर आहे, या गोष्टीची कोणी दखलच घेत नाहीं. स्त्रीनें शिक्षण घेतले तर ते केवळ तिच्या मातापित्यांची शोभा म्हणून घ्यावें, तिनें आपल्या नांवापुढे डिग्री लावली तरी जरीच्या पातळाने जशी तिच्या सौंदर्यांत भर पडते तितपतच तिच्या डिग्रीची किमत असावी, आणि लग्नाच्या बाजारांत तिची किमत अधिक ठरावी, अशी आमची विचारसरणी आहे.

स्त्रीला मिळणारे शिक्षण नाईलाज म्हणून असू नये, तर ते हेतुपुरःसर दिले गेलें पाहिजे. पण स्त्री सुशिक्षित झाली, स्वतःचे विचार बोलून दाखवूं लागली, रूढीविरुद्ध एकादा नवा विचार तिच्या डोक्यात घोळूं लागला कीं, स्त्रीने आपली मर्यादा सोडली, इतरांच्या धार्मिक भावना दुखावल्या गेल्या, कुटुंबाचा आणि पर्यायाने समाजाचा विनाशकाळ जवळ आला, अशी आरडाओरड कुटुंबांतील व समाजातील माणसें करूं लागतात. याचे कारण असें आहे की हल्लीचा काळ म्हणून स्त्रीने चार पुस्तके जास्त वाचली तरी इतरांनीं तिला स्वतःचे शहाणपण वापरण्याची कधी परवानगी देऊं नये. लहान मुलानें पांगुळगाड्याला धरून बाचकत बाचकत चार पावले टाकली, किंवा अडखळत्या जिभेने दोन बोबडे शब्द बोलले तर टाळ्या वाजवून जसें आपण तेवढ्यापुरतें कौतुक करतो, तसे आणि तितपतच स्त्रीचें शिक्षण हा कौतुकाचा विषय असावा, अशी सर्वसामान्य समजूत असते. क्वचित् यापुढेहि जाऊन स्त्रीच्या विद्वत्तेचा आदर करायला आम्हीं तयार असतों; पण केव्हां ? तिनें तत्वज्ञानावर निबंध लिहिला, आजपर्यंत चालत आलेल्या रूढ संकेतांना धरून चार व्याख्यानें दिली कीं आम्ही तिचा विदुषी म्हणून अवश्य गौरव करूं. याचें कारण, स्त्री कितीही शिकून विदुषी झाली तरी स्त्रीस्वातंत्र्याचे विचार बोलून न दाखविण्याइतकी आणि रूढीविरुद्ध वागून आपल्या मतांचें कृतीनें समर्थन

न करण्याइतकी ती जुन्या जगात वावरत असल्याची खात्री आहे तोपर्यंत तिच्या विद्वत्तेचे कौतुक करायला आमची हरकत नाही. पण स्त्रीच्या शिक्षणानें जर तिच्या डोक्यातून रूढीविरुद्ध नव विचार येणार असतील, ती आपलें व्यक्तिमत्व सिद्ध करणार असेल, आणि जुनाट संस्कारांचे आवरण झुगारून देऊन आपली कुचंबणा जगापुढें मांडण्याचे धैर्य दाखवणार असेल तर...तर आम्हांला स्त्रीला एवढं स्वातंत्र्य देण्याची बिलकूल इच्छा नाही! तिच्या व्यक्तिमत्वाची आम्हांला जरूरी नाहीं.

आजपर्यंत आम्ही स्त्रीवर जी बंधनें लादली त्याच ओझ्याखालीं वांकून तिनें आपलें अबलत्व सार्थ केलें पाहिजे, अशी आमच्या सामाजिक मनाची घडण असल्यानें त्या दृष्टीनें आम्ही मुलीच्या शिक्षणाकडे, त्यांच्या आर्थिक स्वावलंबनाकडे व स्त्रीजीवितविषयक प्रश्नाकडे पाहातों आणि याच दृष्टिकोनानें विचार केला म्हणजे स्त्रीनें परावलंबनांतून मुक्त व्हावें, स्वावलंबी असावें, असें म्हणणे आम्हांला जड जातें. तें आमच्या जिवावर येतें, नि म्हणूनच आर्थिक दृष्ट्यासुद्धां आम्ही स्वावलंबी होणें जरूर आहे या गोष्टीवर कोणी जाणूनबूजून भर देत नाहीं. साऱ्यांचे म्हणणे एकच, " करायच्या आहेत काय या आर्थिक भानगडी तुम्हांला? नवरा मिळवता असला म्हणजे झालें." आणि आम्हीहि अशा भाबड्या आहोत कीं डॉक्टर नवरा मिळाला की लगेच आम्ही डॉक्टरीणबाई होऊन बसतों; वकील नवरा मिळाला कीं वकीलीणबाई म्हणून मिरवितो. नवरा डॉक्टर अगर वकील असणें ही गोष्ट अभिमानाची नाही असे कोणत्या स्त्रीला वाटेल? ही गोष्ट जरूर अभिमानाची आहे. नवऱ्याची विद्वता, नवऱ्याचे मोठेपण हा पत्नीचा अभिमानविषय नाही असे म्हणण्याचा माझा मुळीच आशय नाहीं. पण 'डॉक्टरीणबाई' किंवा 'वकिलीणबाई' हा केवळ शाब्दिक गौरव आमच्यावर प्रसंग आला असतां तो मुळींच उपयोगी पडणार नाहीं, ही गोष्ट मात्र यापुढें स्त्रियांनी विसरून चालणार नाहीं.

आपल्यावर प्रसंग आला असतां आपली अवस्था हीनदीन होतां कामा नये, याची खबरदारी स्वतःच्या बुद्धीप्रमाणे व मगदुराप्रमाणे प्रत्येक स्त्रीनें आणि तिच्या पालकानें अवश्य घ्यावयास हवी. तशी ती आजपर्यंत घेतली गेली नाहीं, म्हणून कर्तृत्ववान् नवरे अकालीं मृत्युमुखीं पडल्यानंतर कित्येक

स्त्रियांना हातांत पोळपाटलाटणें घेण्याची वेळ आली. सर्वस्वी नवऱ्याच्या जीवनावर जगणाऱ्या आम्हां पांढरपेशा स्त्रियांची या दृष्टीने फार मोठी दैना आहे आणि त्याचे कारण आमचे परावलंबन हेच आहे. एखाद्या पुरुषाची बायको अर्ध्या संसारावरून उठून गेली, तर तो पुरुष कांही लगेच निराधार होत नाही; त्याच्यावर आकाश कोसळून पडत नाही. कुटुंबांतील एखादी व्यक्ती नाहीशी होणे एवढेच त्याचे महत्त्व आहे. पण एखाद्या बाईचा नवरा अकालीं मरण पावला तर तिच्यावर आकाशीची कुऱ्हाड पडते. तिच्या मुलांची, तिच्या इस्टेटीची वासलात लावण्यास तिऱ्हाईत माणसाचे कोंडाळें तिच्या भोवती जमते. आर्थिक जबाबदारी पार पाडण्यास ती असमर्थ असल्याने तिच्या नवऱ्याची इस्टेटहि इतर आप्त मंडळी गिळून टाकीत असतात. एवढेच नव्हे तर, तिच्या मुलांना शिक्षण कोणी द्यावे, त्यांना कोणी साभाळावें, त्यांच्या रहाण्याची सोय काय करावी, या तिच्या अत्यंत जिव्हाळ्याच्या आणि महत्त्वाच्या बाबतीतही तिच्या सल्ल्याने कांहींहि न होतां, तिची आप्त मंडळी जे ठरवितील त्यावर सारे कांही अवलंबून राहाते. समाजांत कांही स्त्रिया अशा दिसत आहेत की त्यांच्या मुली दुसऱ्यांच्या घरीं साभाळावयास दिलेल्या असतांना त्या स्वतः परक्या घरांत पोटाच्या मागे लागून अपमानास्पद जिणे जगत असतात. ज्यांच्या घरीं त्या मुली राहिलेल्या असतात त्यांचें ह्या स्त्रीवर व तिच्या मुलींवर उपकाराचें ओझें असतें. त्या ओझ्यानें त्या आणखीनच दीन होतात. आणि शेवटी त्याचा परिणाम असा होतो की त्या अनाथ मुलींच्या आयुष्यावर त्यांचा स्वतःचा तर हक्क राहतच नाही, पण आईसुद्धा आपल्या मुलीच्या लग्नाचा प्रश्न स्वतः सोडवूं शकत नाही. ज्यांनीं मुलगी सांभाळली, ते त्या मुलीच्या लग्नाची सोय आपल्या इच्छेप्रमाणे करतात, आणि अखेर या निरपराध मुली एखाद्या म्हाताऱ्या, पंगु, दरिद्री माणसाच्या संसाराची शोभा होऊन राहतात ! कांही मुली तर मला अशा माहीत आहेत की त्यांची लग्ने झाल्याची हकीगत त्याच्या आईला मागाहून समजली ! मागाहून त्यांचा जळफळाट झाला. पण वेळ निघून गेल्यावर त्याचा कांहीच उपयोग नव्हता. पांढरपेशा वर्गापुरतेच बोलावयाचे म्हटले तरी पांढरपेशावर्ग हा कांही नुसत्या मोठ्या शहरांतच सामावलेला नाही. लहान शहरें आणि खेड्यांपाड्यांत

जाऊन पाहिलें तर आपणांस दिसून येईल कीं अनेक कुटुंबांतून अशा तऱ्हेची कुचंबणा सर्रास चालू आहे.

या साऱ्या अनर्थांचे कारण हेंच आहे की, स्त्री एखाद्या पुरुषाची अर्धांगी होते, तेव्हा सांसारिक जबाबदारी सर्व बाजूंनी पार पाडण्याइतकी कार्यक्षमता तिच्या अंगी आलेली नसते; नव्हे, तसा प्रयत्नच केलेला नसतो. स्त्रीच्या आयुष्याची सफलता आम्ही प्रयत्नापेक्षा दैवावर अवलंबून ठेवलेली आहे. तिच्या नशिबानें तिच्यापुढे जे वाढून येईल तो घास तिने निमूटपणें गिळावा अशी स्त्रीजीवनाची आमची कल्पना आहे. स्त्रीला मुद्दाम दुःखात ठेवण्याची आमची इच्छा आहे म्हणून आम्ही असे केले, असे मुळीच नाही. स्त्रीला सुख मिळू नये, तिने दुःखांतच पिचत रहावे, हा आमचा मूळ हेतु नाही. पण स्त्रीने दुःखी राहण्यांत, निमुटपणे सारे सोसण्यातच तिचे अंतिम कल्याण आहे, अशी आमची भावना असल्यानें आम्ही तिला परावलंबी ठेविली; म्हणून नवऱ्याच्या नशीबावर बायकोचे नशीब अवलंबून राहिलें. हुशार नवऱ्याच्या अर्धवट बायकोला नवऱ्याच्या हुशारीकडे पाहून शहाणपणाचा मक्ता दिला जातो. नवरा श्रीमंत असेल तर बायकोला काडीचीहि अक्कल नसतांना ती एखाद्या महिला समाजाची सहज अध्यक्ष होऊ शकते. याच्या उलट एखाद्या मूर्ख नवऱ्याच्या शहाण्या बायकोला नवऱ्याच्या मूर्खपणाचें ओझे डोक्यावर घेऊन जन्म काढावा लागतो. या सर्वांचे कारण तरी हेच आहे की, स्त्रीनें आपले कर्तृत्व, आपलें नशीब सर्वस्वी दुसऱ्यावर अवलंबून ठेविले. पुरुष कठिण प्रसंगांत बायकोच्या सहाय्याशिवाय ज्या कार्यक्षमतेनें संसाराचा गाडा न अडखळता चालू ठेवतो, तीच कार्यक्षमता निदान प्रसंगापुरती तरी स्त्रीच्या अंगी असेल तर तिच्या आयुष्याचे असे धिंडवडे होणार नाहीत.

मुलाच्या शिक्षणाचा हेतु जसा मुलाने भावी आयुष्यात स्वावलंबनाने, स्वतःच्या कर्तबगारीवर स्वाभिमानानें जगावे असा असतो, तसाच हेतु मुलीला दिल्या जाणाऱ्या शिक्षणामागे असावयाला हवा आहे. मुलाच्या बाबतींतसुद्धां हाच हेतु असतो असें म्हणणे कदाचित् चुकीचे होईल. कारण मुलानेंसुद्धां शिकून सवरून स्वतःचें डोकें वापरावें, ही गोष्ट पुष्कळ पालकांना

संमत नसते. मुलगा शिकून कुणीकडून मार्गाला लागला म्हणजे आपण सुटलों, हाच विचार त्याला शिक्षण देण्याच्या बुडाशी असतो. वास्तविक, बापानें आपला मुलगा स्वतःच्या हिमतीवर, आत्मविश्वासावर आणि कर्तृत्वावर मोठा होऊन भावी आयुष्यात तो यशस्वी होईल, असेंच शिक्षण त्याला दिलें पाहिजे. त्याला शहाणा करून जगात सोडला पाहिजे. पण आमचें उलट होते. मुलाला आपल्या मागे जास्तीत जास्त इस्टेट ठेवण्यासाठीं आम्ही जीवाचा आटापीटा करतो, त्या मानानें प्रत्यक्ष त्या मुलालाच कार्यक्षम करण्याकडे आमचे प्रयत्न अपुरे पडतात. आणि मागून त्याला ठेविलेली इस्टेट त्याने उधळून टाकली म्हणजे तिकडूनहि बापाच्या पदरीं दुःखाचे गाठोडे येते.

मुलीच्या बाबतींतहि अशीच गोष्ट होत आलेली आहे. मुलीचा जन्म म्हणजे पापांची परंपरा हीच आमची खुळी समजूत कायम आहे. तिला भोगाव्या लागणाऱ्या आपत्ती ही निसर्गाचीच अवकृपा असे आम्ही समजतो, पण हें खोटे आहे. मुलींना जास्त आपत्तींना तोंड द्यावे लागते याचा अर्थ तरी काय आहे ? माणूस जेवढा खुळा, बोटचेपा, परावलंबी तेवढे अडचणींचे डोंगर जास्त, ही अनुभवसिद्ध गोष्ट आहे. माणूस लुळा पांगळा असला की संकटेंच त्याच्याकडे धावत येत असतात. एका राष्ट्रावर दुसऱ्या राष्ट्राकडून सतत जुल्म होत राहणे याचा उघड अर्थ हाच असतो की पहिल्या राष्ट्राची कार्यक्षमता दुसऱ्या राष्ट्राशी टक्कर देण्याइतकी प्रखर नसते. तीच गोष्ट स्त्रियांची झाली आहे. स्त्रीला आपत्तीशी झुंजावे लागते आणि दीन जिण्याचा अंगिकार करावा लागतो याचे कारण निसर्ग किंवा स्त्रीचा जन्म म्हणजे पाप हे नसून, स्त्रीला अजूनपर्यंत स्वतःचें जीवन स्वावलंबनाने जगण्याचे कोणी शिकविलेंच नाही व स्वतः होऊन शिकण्याचा तिनें प्रयत्नहि केला नाहीं, हेच आहे. स्त्रीचें जीवन अधिक सुखाचे, स्वावलंबनाचें व्हावयास हवें असेल, आयुष्यांत येणाऱ्या आपत्तींना धैर्यानें तोंड देऊन तिने मानानें जगावे असें वाटत असेल, तर तिच्या मानसिक, शारीरिक आणि बौद्धिक शिक्षणाची अगोदर सोय व्हावयास पाहिजे.

असें म्हणतात की, माणसाचें बुद्धिवैभव थोडे कमी असलें तरी चालेल पण तो शहाणा असावयाला पाहिजे. सामान्य माणसाच्या दृष्टीनें विचाराचा

हा समतोलपणा अगदी यथार्थ आहे. प्रत्येक स्त्री, वकील बॅरिस्टर होऊन कोर्टात खटले गाजवील किंवा डॉक्टर होऊन संशोधन करील असें नव्हे. पण स्वतःच्या आयुष्यांत होणाऱ्या घडामोडीचा अर्थ तिला समजेल आणि त्यांतून शहाणपणाचा मार्ग शोधून काढून ती स्वाभिमानाने जगेल इतपत शहाणपणाचे शिक्षण तिला मिळालेंच पाहिजे असें आम्ही म्हटलें तर तें गैर ठरेल काय ?

बौद्धिक शिक्षण म्हणजे केवळ शाळाकॉलेजात पुरुषाच्या बरोबरीने मिळणारे शिक्षण हेच नव्हे. साऱ्याच मुलींना बी. ए. होऊन मास्तरकी अगर कारकुनी करणे अशक्य आहे. आणि कॉलेजांतील शिक्षण घेण्यास प्रत्येक मुलीला बौद्धिक मगदूर आणि सांपत्तिक परिस्थिति असेलच असेहि सांगता येणार नाही. पण, मला वाटते, प्रत्येक माणसाजवळ कोणतातरी एखादा असा गुण असतो की त्या गुणाची वाढ केल्यास तो त्यात प्रवीण होऊं शकेल. निसर्गतःच पुष्कळ मुलींचे आवाज अतिशय गोड असतात. पण अशा आवाजाच्या मुलींना संगीताचे शिक्षण देण्याची दखल कितीसे आईबाप घेतात ? आणि ती मुलगी तरी मोठी झाल्यावर आपल्या आवाजाचें कितीसे चीज करते ? मोठ्या दुःखाची गोष्ट आहे की आपल्या मुलांत खरोखरी कोणते गुण आहेत आणि त्यांची जोपासना आपण कशी करावयास पाहिजे याची जाणीवच कित्येक पालकांना नसते. आणि मुलांनाहि स्वतःच्या गुणांची उपेक्षाच करावीशी वाटते. ही खरोखरी व्यक्तिशः नुकसानीची आणि सामाजिक हानीची गोष्ट नाही काय ? पण आम्हीं एवढा विचार कुठे करतों ? ठराविक चाकोरीतून मुलांचा शिक्षणक्रम झाला की गंगेत घोडे न्हाले !

मुलांच्या शिक्षणाचीसुद्धां हीच आबाळ आहे तर ज्या मुली शिक्षणाचा विचार नुकताच करूं लागल्या आहेत त्यांची गोष्ट काय विचारावी ? कित्येक मुलींना पेंटिंगची, आवाजाची, नैसर्गिक देणगी असूनहि केवळ उपेक्षेनें त्या घरीं बसून रहातात. आणि प्रसंगच पडला तर बाहुल्यांच्या कारखान्यांत चिंध्या शिवावयास जातात. याचें कारण नैसर्गिक गुणांची उपेक्षा हें तर आहेच, पण अकालीं प्रौढत्व, तरुण वयांत म्हातारपण आल्याची समजूत करून घेणें, हेंहि आहे. लग्नापूर्वीं जी मुलगी चुटचुटीत आणि चलाख वाटते

ती लग्न झाल्याबरोबर एकदम ‘ बाई ’ होऊन बसते. आणि एखादे मूल तिच्या कडेवर बसू लागले म्हणजे आपले ओचेपदर व्यवस्थित ठेवून नीटनीटके राहण्याची तिची आवडसुद्धा नाहींशी होते ! एवढेच नव्हे तर तिच्या बोलण्याचे विषय आणि भाषासुद्धां अजीबात बदलूं लागतात. आपले मूल म्हणजे एक वीतभर पोर आणि आपण म्हणजे आतां आजीबाई झालो असे तिला वाटूं लागते. आम्हांला महत्त्वाकांक्षाच नाहीं, उत्साहच नाहीं, आयुष्याला रंजकता आणण्याची तळमळ आम्हाला नाहीं. लग्न झाल्यावर मुलीने तरुणीची भाषा बोलावी हे साहजिक आहे. पण ती एखाद्या चार मुलांच्या आईसारखी बोलूं लागली की, हिला म्हातारी व्हावयाला फारसा वेळ लागावयाचा नाहीं, असे वाटूं लागते. मुलाच्या आईने मुलाशी आईच्या मोठेपणाने बोलावे हे ठीक आहे. पण इतराशी बोलतांना, “ आतां आमचे काय राहिले आहे ? सारे कांहीं मुलांच्यासाठी करावयाचे.” ही भाषा, विचारसरणी कशाला ? मुलांच्यासाठी करावयाचें हे खरे असले तरी, “ आमचे काय राहिले आहे ? ” हा वाक्यप्रयोग कांहीं बरोबर वाटत नाही. तरुण स्त्रियाच जर असें बोलूं लागल्या तर म्हाताऱ्या बायानी तरी काय बोलावयाचे? त्याना चार हताश उद्गार बोलावयाला आम्ही शिल्लक ठेवावेत की नाहीं ?

वय कितीहि वाढले तरी जगात इतक्या गोष्टी माणसास शिकण्यासारख्या आहेत की जन्मभर माणसाची विद्यार्थीदशा संपावयाची नाहीं. पण आमच्या या उदासीन वृत्तीमुळेच आमचे गुण आम्हांला समजत नाहीत. त्याची वाढ होत नाही नि त्यामुळे आमचे पाऊल कधीं पुढें पडत नाहीं. पण विचार केला तर जरूरी म्हणून स्त्रियांना स्वावलंबनाने पैसे मिळवतां येतील अशी कितीतरी दालनें त्यांना खुली आहेत. नर्सिंग, कारकुनी, टाइपिंग, शिवणकाम, भरतकाम, सेल्समनशिप, गायन, चित्रकला, फोटोग्राफी, एखादें स्टोअर चालविणें, छापखान्यांत कंपोझिंग करणे, अशा अनेक क्षेत्रात स्त्रिया उत्तम तऱ्हेनें काम करूं शकतील यांत मुळीच वाद नाही. कारण अशा क्षेत्रांतून कामें केलेल्या स्त्रिया इतर समाजांत अनेक आहेत.

बौद्धिक किंवा आर्थिक स्वावलंबनाच्या दृष्टीनें हे विचार झाले. पण मुली मनानेंच खरोखरी कणखर आणि धीट व्हावयास हव्या आहेत. आपल्या कल्पना काय आहेत, आपणांस काय वाटतें हें स्पष्टपणें सांगण्याचें धैर्य

प्रत्येक माणसाजवळ असले पाहिजे. या दृष्टीनें मुलेंसुद्धां कित्येक वेळां धीटपणा दाखवीत नाहींत. पण मी फक्त मुलींच्या दृष्टीनेच लिहीत असल्यानें त्यांच्याच संबंधी काय वाटते ते सागते. मी म्हणते तसा मोकळेपणा आपल्या मुलींनी दाखवावा, आपल्याशी बरोबरीच्या नात्याने वागावें अशी कोणाची इच्छा नसते. मनांतले विचार न बोलतां तिनें स्वतःची कुचंबणा करून घेतली की आम्हीं त्या गोष्टीला ‘ शालीनता ’ हे गोडस नांव देतो ! माणूस शालीन असावा हें खरे आहे. पण तो न्यूनगंडाने पछाडलेला, भित्रा असावा हे मात्र फार घातक आहे. हा भित्रेपणाच आमच्या रोमरोमांत इतका भिनला आहे की आमच्या हातून कोणतीहि गोष्ट पार पडत नाहीं, दर वेळी आम्ही मागे पडतां, आमच्याजवळ आत्मविश्वासच नाही. मुलीनें रोजच्यापेक्षां थोडें निराळें करणे म्हणजे पाप, उद्धटपणा, अशा विचासरणीचे जे संस्कार आमच्या मनावर आघात करीत आलेले आहेत त्याचें हें फळ आहे. ते अगोदर नाहीसे झाले पाहिजेत. कारण कोणत्याहि गोष्टीला प्रत्यक्ष आरभ करण्यापूर्वी त्या गोष्टीचे महत्त्व माणसास पटावयास हवें. आणि महत्त्व पटून तसे वागण्याचें मानसिक धैर्य उत्पन्न व्हावयास हवे. त्याशिवाय काही उपयोग नाही. नि म्हणूनच मानसिक शिक्षणाला फार महत्त्व आहे.

आपल्या मुली भित्रेपणाने मागे राहिल्या तरी चालतील, पण त्यांनी जरासुद्धा हालचाल करता कामा नये, यात भूषण मानण्यापेक्षा, आपल्या मुली शरीर आणि बुद्धीप्रमाणेंच मानसिक दृष्ट्याहि निकोप व्हाव्या म्हणून काळजी घेतली पाहिजे. आपली मुलगी न्यूनगंडाने खचून गेलेली नाही तर स्वतःच्या डोक्याने विचार करणारी आहे, धैर्याने जगणारी आहे, याचा तिच्या आईवडिलांस वास्तविक अभिमान वाटावयास हवा. आणि स्वतः मुलींनाहि, आपण दुबळ्या नाही, खंबीर आहोत, भित्र्या नसून समर्थ आहोत, याचा स्वाभिमान वाटावयास हवा. अशा तऱ्हेनें तिच्या मनाची तयारी झाली तरच ती खऱ्या अर्थाने स्वावलंबी होईल, व आपल्या मुलानासुद्धां स्वतत्र वृत्तीचें, स्वतंत्र विचारसरणीचे शिक्षण देऊं शकेल. जी स्त्री स्वतःच्या कुचंबणेनें मरून गेली आहे ती आपल्या मुलाना स्वतंत्रतेचे धडे काय देऊं शकणार ?

नुसतें आर्थिक स्वातंत्र्य म्हणजे स्वावलंबन नव्हे. आर्थिक स्वावलंबनानें

स्त्रीच्या अनेक आपत्ती टळतील हें खरे आहे. नि म्हणूनच त्याचे महत्त्व आहे. पैसे मिळविणारी स्त्री आपल्या कुटुंबाला आर्थिक दृष्ट्या सावरून धरील हे खरे आहे. पण मनाने ती दुबळी असेल तर त्या पैशांचा विनियोग ती स्वतःच्या कल्पनेप्रमाणेसुद्धा करूं शकणार नाही. कांही पुरुषांना रेसचा, सट्ट्याचा नाद असतो. स्वतः कष्ट करून हे लोक पैसे मिळवीत नाहीत आणि बायकोनें चरितार्थासाठी मिळवून आणलेले पैसे हे नवरे खुशाल रेसच्या घोड्यावर लाविण्यास हक्काने नेतात! अशा गोष्टी यापुढे होता कामा नयेत. या गोष्टीला पत्नीने विरोध करणे अत्यंत जरूर आणि न्याय्य आहे. पण केवळ आर्थिक स्वावलंबनानें हे धैर्य अंगी येत नाहीं. याला मनाचा कणखरपणा पाहिजे. आपल्यालासुद्धा अन्याय होता कामा नये, असा पीळ स्त्रीच्या अंतःकरणांत जागृत असला पाहिजे.

बुद्धिमान माणसे जगांत मागे पडतात याचे कारण कित्येक वेळां त्यांचे मानसिक दौर्बल्य हेहि असूं शकते. बुद्धीच्या कसावर घासून आपण ठरविलेली विधाने लोकापुढे छातीठोकपणे मांडणे त्यांच्या मनाला झेपत नाही. आपल्याला प्रामाणिकपणे वाटणारे विचार बोलून दाखविण्यास ती कचरतात, आणि हीच गोष्ट व्हावयास नको आहे. जगातील प्रत्येक माणसास अन्न, वस्त्र, औषधपाणी. घरदार आणि सांसारिक सुख मिळविण्याचा हक्क आहे, मग तो बुद्धीने कोणत्याहि दर्जाचा असो. सामान्य माणसाच्या या कर्मात कमी गरजा भागल्याच पाहिजेत, ही जशी आर्थिक शिकवण आपण आपल्या मनाला देत आहोत, तशीच दुसरी एक शिकवण आपल्या मनाला मिळावयाला हवी आहे की स्त्रीपुरुष यांच्या दर्जात, त्यांच्या सुखाच्या कल्पनेत फरक करण्याचे कांही कारण नाही. स्त्रीवर मातृत्वाची जबाबदारी आहे म्हणून ती उपेक्षणीय, दुबळी असे तिनें व समाजानेहि मुळीच समजतां कामा नये. या अडचणीतून सुटण्याचा मार्ग म्हणजे तिने स्वतः कार्यक्षम होणें हा आहे. स्त्रीचा जन्म हे पाप नसून तिच्यापुढे उभ्या असलेल्या प्रश्नांतून निभावून जाण्याचे शिक्षण तिला मिळाले पाहिजे. म्हणजे ती पुरुषापेक्षां अधिक दुःखी होण्याचे कारणच उरणार नाही.

पण याबाबतीत सर्व असें तिरपागडे आणि अर्धवट होऊन बसलें आहे याचें कारण आमचा जीवनाकडे पाहण्याचा दृष्टिकोन महत्त्वाकांक्षेचा,

प्रामाणिकपणाचा, निःस्वार्थी आणि न्याय्य नसतो. एखादी मुलगी बुद्धिमान् असेल तर तिनें आपल्या बुद्धिमत्तेचा उपयोग आपल्या समाजासाठी, राष्ट्रासाठी करावा, अशी महत्त्वाकांक्षा आमच्याजवळ नसते. अशी महत्त्वाकांक्षा धरण्यास मुलगी ( किंवा मुलगाहि ) स्वतःच्या प्रामाणिक मतांचा आग्रह धरून बसली तर आपल्यात नि तिच्यात खटके उडतील आणि पर्यायानें आपल्या मुलीची हुशारी केवळ आपले भूषण म्हणून रहाणार नाही, या स्वार्थी विचारांचा पालकांच्या मनावर पगडा असतो. आपल्या मुलीला लोकांनी सुशिक्षित, विदुषी तर म्हणावे, पण आपल्या मताविरुद्ध बोलण्याचा प्रामाणिकपणा मात्र तिने दाखवू नये, अशीहि स्वार्थी वृत्ति कित्येकाच्या ठिकाणी असते हे नाकबूल करून चालणार नाही. याहून जास्तच स्पष्ट बोलावयाचे तर आपल्या मुलांच्या आयुष्यावरहि आपल्याच मतांची मालकी चालली पाहिजे, असा कित्येकाचा आग्रह असतो. मुलांच्या आयुष्याकडे ते स्वतःच्या सुखाच्या कल्पनेने पाहतात. अशा या स्वार्थी हेतूनेच मुलाच्या आयुष्याकडे पाहिलें की न्याय-अन्यायाचा प्रश्नच उद्भवत नाही. कारण स्वार्थी दृष्टीला न्याय अन्यायाची चाड असणेच शक्य नाही. सर्वच ठिकाणी असे होते असे माझे म्हणणे नाही. पण समाजांत ही वृत्ति कांही थोड्या प्रमाणात नाही हे मात्र खरें आहे; म्हणूनच मी म्हणते की जीवनाकडे पहाण्याचा आमचा दृष्टिकोन महत्त्वाकांक्षेचा, प्रामाणिकपणाचा, निःस्वार्थी आणि न्याय्य नसतो. पुरुषाने आपणास न्याय मिळवून घेण्याचा प्रयत्न केला आहे. स्त्रीला मात्र अजून न्याय मिळत नाही. कारण तीच तसा व्यवस्थित प्रयत्न करीत नाही. यापुढे मात्र तिने न्यायासाठी झगडले पाहिजे.

• • •

# आर्थिक स्वावलंबन ३

स्त्रीचे जीवन नैसर्गिक जबाबदारी साभाळूनहि जास्तींत जास्त स्वावलंबी असावयास पाहिजे आणि त्यासाठी स्त्रीच्या जीवनाकडे पहाण्याचा आमचा दृष्टिकोन महत्त्वाकांक्षेचा, प्रामाणिकपणाचा, निःस्वार्थी आणि न्याय्य असणे जरूर आहे हे मागील लेखात मी सागितले. त्या अनुरोधाने आर्थिक दृष्ट्या स्त्रीने आजच्या काळात स्वावलंबी असण्याची आवश्यकता व परावलंबी असल्यास होणारे तोटे यांचाहि मी थोडक्यांत उल्लेख केला.

स्त्रियाना आर्थिक दृष्ट्या स्वावलंबी कोठे व कसे होतां येईल, व त्याच्या मार्गांत जी खोट्या भीतीची बुजगावणी उभी करण्यांत येतात त्यांचें निराकरण कसे करतां येईल, याचा विचार प्रस्तुत लेखांत मी करणार आहे.

स्त्रियानी आर्थिक दृष्ट्या स्वावलंबी असलेच पाहिजे असे जेव्हां मी म्हणते तेव्हां समानहक्काच्या अतिरजित कल्पना डोक्यांत घेऊन धरलेला हा दुराग्रह आहे किंवा याबाबतीत पुरुषांशी स्पर्धा करावयाचा हेतु आहे असे मुळीच नाही. आजची आमची आर्थिक परिस्थितीच अशी ओढाताणीची आहे की संसाराची महिनाअखेर तोंडमिळवणी करण्यास पुरुषाबरोबर बाईनेंहि प्रत्यक्ष भाग घेऊन मदत करणे जरुरीचें होऊन बसलें आहे. शंभर सव्वाशे रुपये पगार मिळविणाऱ्या माणसानें चार पांच माणसांचा संसार, कर्ज न काढता चालविणे हे हल्लीच्या महागाईच्या दिवसांत एक भयंकर दिव्य झालें आहे. जागाभाडें, दूध, रेशन, वाणी, जळण, कापड, डॉक्टर, धोबी, शिंपी- आणि इतर अनेक सटरफटर गोष्टी की ज्या केल्याशिवाय माणसाला गत्यंतर उरत नाहीं—यांत पगाराची चटणी केव्हां उडून जाते याचा पत्ताहि लागत नाही. आणि पगार पुरत नाहीं म्हणून अन्न खाल्ल्याशिवाय, कपडे वापरल्या- शिवाय किंवा भाड्याची जागा घेतल्याशिवाय, माणसाचें चालतहि नाहीं.

जगांतले चार दिवस सुदृढ प्रकृतीनें जगावयाचें असेल तर जीवनास

आवश्यक असणाऱ्या या गोष्टीत कोठेंहि काटकसर करण्यास जरासुद्धां फट सांपडणार नाहीं. उलट चार खणांच्या दोन खोल्यांत दोन दोन मुलांसह दोन दोन जोडपीं संसार करीत असलेली कित्येक ठिकाणीं आपणांस दिसतात. त्यांतच जागा नाही म्हणून टिचभर गॅलरीत एखाद्या पुतण्यास अगर भाच्यास अंगाचा कानवला करून निजण्यास जागा द्यावी लागते. या जागेचे जे पांचसांत रुपये भाडे मिळते त्यांतूनच मुलांचें रेशनचें दूध घेऊन चहापाणी भागवावें लागते. आणि जेवतांना ताक नांवाचा पदार्थ पाण्याच्या रूपाने भातावर घेऊन ताकाची जरुरी अक्षरशः पाण्यावर भागवावी लागते.

याहून काटकसरीची जास्तीत जास्त करामत तरी कोणती आहे? नवऱ्याची बिचाऱ्याची दिवसभर कामासाठी धावपळ चालू असते. त्याने तरी किती तास काम करावे? एकाने मरमर मरावे व इतरांनी काटकसर करून करून थकून जावे हा कांही खरोखरी जीवंत राहण्याचा उपाय नव्हे. नवऱ्याचा पगार जेव्हां अपुरा पडतो, तेव्हां घरांत काटकसर करून अर्ध-पोटीं राहणे, किंवा कोणास आजार झाल्यास दुखणे तसेंच अंगावर काढणे, हाहि खराखुरा मार्ग नव्हे तर रोजच्या आवश्यक गरजेपुरते पैसे मिळवून संसारास मदत करणे हे पत्नीचे अशा वेळचे प्रथम कर्तव्य आहे. घरांत उंदीर झाले आणि कपडे कुरतडून त्यांची खराबी करू लागले तर कपड्यांना ठिगळें लावीत बसणे हा त्यावरचा खरा उपाय नव्हे, तर प्रत्यक्ष उंदीरच पकडून ते मारून फेकून दिले पाहिजेत. म्हणजे शिल्लक असलेले कपडे तरी निदान धड राहतील. काटकसर करण्यास जर वावच नसेल तर दात कोरून पोट भरणे शहाणपणाचे नाही. पोटभर मिळावे म्हणून यापुढे स्त्रीनेसुद्धां धडपड करणे आवश्यक आहे आणि यांत कमीपणा वाटण्याचे किंवा आपण विशेष कांही करीत आहों असेंहि वाटण्याचे मुळीच कारण नाही. गरज उत्पन्न झाल्यावर आपणहि चार पैसे मिळवून संसारास हातभार लावूं शकतो एवढा आत्मविश्वास स्त्रीच्या ठिकाणी उत्पन्न झाला तरी पुष्कळ झाले असे म्हणावयास हरकत नाही.

स्त्रीनें द्रव्यार्जन करावें असें मी म्हणते याचा अर्थ, प्रत्येक स्त्रीने जरूर नसतांनाहि नोकरी करावी, असा मात्र नाही. पण प्रसंग पडल्यास श्रीमंत

नवऱ्याच्या बायकोनेंहि चार पैसे मिळविण्याची समर्थता आपल्या अंगीं आधींच आणली पाहिजे हाच माझ्या म्हणण्याचा हेतु आहे. आपल्या आयुष्याच्या बाबतींत आपण अजिबात गाफील राहिलो, असा पश्चात्ताप वाटण्याची पाळी येऊं नये म्हणून ही सावधानता आहे. पण ज्यांचे नवरे चांगले पगार मिळविणारे आहेत त्यांनी घराची जबाबदारी नोकरांवर टाकून बाहेर पैसे मिळविण्यास जावें असे मात्र मी मुळींच म्हणणार नाहीं. कारण नवरा पैसे मिळविण्यास कामावर जातो तेव्हां स्त्रीसुद्धां घरातील कामकाज करून संसारांत एकप्रकारें आर्थिक मदतच करीत असते. आणि कामाच्या दृष्टीनें विचारच केला तर नवऱ्याची ताबेदारी दिवसाकाठीं आठ दहा तासांचीच असते. पण बायकोचें मात्र तसें नसतें. सकाळीं उठल्यापासून रात्रीं निजेपर्यंत ती आपल्या संसारासाठीं सारखी राबत असते.

निसर्गामुळें बाहेरचें द्रव्यार्जनाचें काम पुरुषावर पडलें व घरातील जबाबदारी स्त्रीवर पडली म्हणून कांहीं स्त्रीनें सांभाळलेल्या जबाबदारीचें महत्त्व कमी होत नाहीं. हीं घरचीं कामें सांभाळून पुन्हां पैसे मिळविण्याचें काम करणें हे वास्तविक दुहेरी श्रम आहेत. ते ज्या स्त्रियांना करणें जरूरच आहे त्यांनी ते केले पाहिजेत हें खरें आहे. पण ज्यांच्यावर तशी पाळी आली नाहीं, त्या स्त्रियांनी आपलीं घरातील कामेंच अधिक व्यवस्थित आणि स्वावलंबनानें करावींत. एखादा नोकर कमी ठेवणें, स्वतः स्वयंपाक करणें, शक्यतों सर्व कपडे घरींच शिवणें, मुलांना स्वतः शिकविणें वगैरे कामें ज्या स्त्रिया स्वतःच करतात त्या एकप्रकारें पैसे मिळवीत असतात असेंच नाहीं काय? साधारण सुस्थितींतल्या स्त्रियांनीं स्वतः घरकामें करून पैसे वाचविणें म्हणजे पैसे मिळविणेंच होय.

पण ही गोष्ट आम्हा स्त्रियांच्या अजून तितकीशी ध्यानांत आलेली नाहीं आणि पुरुषांनीहि घरकाम करणाऱ्या स्त्रीची त्या दृष्टीनें दखल घेतलेली नाहीं. ‘ पुरुष स्त्रीला घरकामाची मोलकरीण समजत असतो ’ असलें अतिरेकाचें विधान मला मुळींच करावयाचें नाहीं. पण स्त्री जशी नवऱ्याला आर्थिक दृष्ट्या घराचा स्वामी समजत असते, त्या अर्थानें मात्र पुरुष तिला घराची स्वामिनी म्हणावयाला तयार नसतो. पुरुषाला आपल्या नातेवाईकास किंवा एखाद्या संस्थेस मदत करावयाची असली तर बायकोला

न विचारतां तो झटदिशी आपणांस वाटणारी रक्कम देऊन मोकळा होतो, स्त्रीला मात्र रुपया–दीडरुपया कोणास देऊं किंवा नको हे नवऱ्यास विचारल्याशिवाय स्वतः ठरवितां येत नाहीः याचे नवऱ्यास नवल वाटत नाहीं व बायकोसहि कमीपणा वाटत नाहीं! घरात येणारा पैसा हा स्वतःच्या श्रमाचा आहे याची नवऱ्यास पुरेपूर जाणीव असते नि त्याच वेळी बायकोनें सांभाळलेल्या घरातील जबाबदारीची किंमत रुपये–आणि–पैच्या दृष्टीनें तो अगदीं सहज रीत्या शून्य समजत असतो. बायकोलाहि यात फारसे वैषम्य वाटत नाहीं, याचेंहि कारण हेंच की ज्या संसारांत आपण जन्मभर राबत आलो त्याचे मूल्य तिच्या स्वतःच्या मनालाहि कधीं समजूं शकलें नाहीं आणि कोणीं समजावून दिलेंहि नाहीं.

स्त्रीने साभाळलेल्या अत्यंत अवघड जबाबदारीची उपेक्षा पुरुष आणि स्त्री या दोघांकडूनहि आजपर्यंत होत आली, याचेंहि कारण हेच आहे की घरचे–चूल–मूल–साभाळले तरी प्रत्यक्ष पैसे मिळविण्याचा प्रसंग आल्यास स्त्री अखेर परावलंबी म्हणून दुबळी ठरली आहे. याची जाणीव दोघांनाहि आहे: पण गमत अशी आहे की हे परावलंबनच आतां नाहीसे झाले पाहिजे हे आम्हास अजून नीटसे उमगले नाहीं. ते परावलंबन ज्या स्त्रीने झुगारून दिले असेल तिच्या घरकामाचे मूल्य अशा उपेक्षेने होणारच नाहीं, आणि अशी उपेक्षा ती सहनहि करणार नाहीं.

म्हणून माझे पुन्हां पुन्हा हेच म्हणणे आहे, की पुरुषाप्रमाणेच स्त्रीनेंहि आर्थिक स्वावलंबनाची तयारी करावी आणि मगच लग्नाच्या भानगडीत पडावे. मग घरकामे करतांना तिला आपोआपच वाटेल की, घरचे काम करूनसुद्धा मी हा पैसाच मिळवते आहे; आणि नवऱ्यालाहि वाटेल की, बाहेर जाऊन हिनें शंभर रुपये मिळवावयाचे आणि घरकाम सांभाळण्यासाठीं नोकरांवर जवळजवळ तेवढेच पैसे खर्च करावयाचे यांत काय अर्थ आहे? त्यापेक्षां स्वयंपाक, शिवणकाम वगैरे घरची कामे करून ती तेवढे पैसे शिल्लकच टाकते आहे. ती रक्कम खरोखर तिचीच मिळकत आहे, आणि हें अक्षरशः खरेंच आहे.

पण हें सर्व व्हावयास स्त्रीने आपली शैक्षणिक कार्यक्षमता वाढवून घ्यावयास पाहिजे हें विसरून चालणार नाहीं. या मुद्यावर मी मागील लेखांत भर

दिलेलाच आहे. पण त्याचें महत्त्व ध्यानांत आले म्हणजे ' स्त्रीनें केलेलें घरकाम ही तिची मिळकतच आहे, ' या माझ्या म्हणण्याचा अर्थ स्पष्ट होईल. अर्थात् याची जाणीव स्त्रीने तशी पुरुषानेंहि ठेविली पाहिजे. आपल्या नवऱ्याच्या मिळकतीचा अंदाज घेऊन आपल्या इच्छेप्रमाणें काही रक्कम खर्चावयास स्त्रीला संकोच वाटण्याचे मुळीच कारण नाही व पुरुषानेंहि एवढे स्वातंत्र्य तिला खुषीने दिलें पाहिजे.

प्रत्यक्ष नोकरी करून स्त्री पैसे मिळवीत नसली तरी तिच्या घरकामाचे मूल्य म्हणजे आर्थिक मिळकतच आहे, ही समजूत जशी पुरुषाने दाखवावयास पाहिजे तशीच स्त्रीनेंहि. पतीच्या आपत्काली किंवा तो आजारी पडल्यास, स्वतःच्या श्रमाने पैसे मिळवून आपला संसार चालविला पाहिजे. नवरा जास्त पैसे मिळवूं शकत नसला किंवा शारिरीक उपाधीने त्यास कांहीं काळ अंथरुणावर पडून राहावे लागले तर त्यासाठी त्याच्यावर न जळफळतां त्यास आर्थिक सहाय्य करणे हे पत्नीचे कर्तव्यच आहे. पुरुषाची मदत कमी पडताच स्त्रीने आपल्या श्रमाने ही कसर भरून काढणे म्हणजे स्वतःच्या कर्तृत्वाबद्दल आत्मविश्वास वाढविणे असेहि आहे, नि यांत आपण नवऱ्यावर उपकाराचें ओझे घालीत आहो असें स्त्रीने समजण्याचे मुळीच कारण नाही.

काही काही ठिकाणी पुरुष इतके चांगुलपणाने वागणारे दिसतात कीं वर्षभर बायको अंथरुणावर निजून असली तरी नवरा ऑफिसातील काम करून आल्यावर बायकोस घरकाम पडूं नये म्हणून जीवाचा आटापिटा करीत असतो. एवढेच नव्हे तर मुलांच्या बरोबर तो पत्नीस जेवावयास वाढतो व मग आपण जेवतो. शिवाय आपल्याला होणाऱ्या त्रासाची जाणीव न देण्याचा मोठेपणा दाखवितो तें निराळेच ! अशी उदाहरणे फार थोडी असतात हे खरे आहे; पण असतात हे कांहीं खोटे नाही. मग नवऱ्याने जसे प्रसंग पडल्यास बायकोची कामें करणें जरूर आहे, तसेच बायकोनेंहि नवऱ्याची बाजू सांभाळावी लागल्यास माघार न घेणे हे ओघानेच आलें. त्यांत नवऱ्याला मिंधेपणा वाटेल असे त्याच्याशी वागण्याचे कारण नाही.

क्वचित् अशींहि उदाहरणे दिसतात कीं पुरुषाच्या बरोबरीने पैसे मिळविणारी स्त्री नवऱ्यास कमी लेखूं लागते किंवा याच्या उलट असेंहि होतें की नवऱ्यासच या गोष्टीचे वैषम्य वाटून तो फटकून वागूं लागतो. पण हें असें

होण्याचेंहि कारण हेच आहे की, स्त्रीने पुरुषाच्या बरोबरीने पैसे मिळवूं लागावे ही आपल्याकडे अजून नवीन गोष्ट आहे. ही नवीनता जशी स्त्रीस तशी पुरुषासहि असल्याने ती अजून दोघांच्याहि पचनी पडलेली नाहीं. एखादी स्त्री, डॉक्टर नवऱ्याची बायको झाल्याबरोबर तिची पावले जमिनी-पासून दोन बोटें अधांतरी पडूं लागतात. आपल्या नवऱ्याच्या मोठेपणाचा अभिमान तिला वाटूं लागतो. कारण असा अभिमान वाटण्याची शिकवण तिच्या मनाला आज हजारो वर्षे मिळत आलेली आहे. त्या भरांत ती डॉक्टरीणबाई म्हणून मिरविण्यांत मुळीच कमीपणा मानीत नाही.

पण एखाद्या मॅट्रिक माणसाची बायको उद्या डॉक्टर झाली, तर तिचा मोठेपणा तिच्या हातातील इंजेक्शनच्या सुईसारखा त्याला केव्हां तरी बोचल्या-शिवाय रहात नाही. मग बायकोच्या ज्ञानावर स्वतःस डॉक्टर म्हणवून घेण्यास तो कोठचा तयार होणार? उलट एखादे वेळीं आपल्या शिकलेल्या बायकोचे कौतुक न करतां तो केव्हातरी तिला मुद्दाम असें म्हणेल की, ‘ काय तुला म्हणाव! माझ्यापेक्षा चार डिग्र्या तुझ्या नावापुढे जास्त लावलेल्या असल्या तरी शेवटी तू बायकोच!’ म्हणजे शिक्षणाने आपली बायको पुरुषी वळणाची झाली नाही याचेच दुःख तो मानूं लागतो! किंवा एखादे वेळीं बायकोने बरोबरीच्या नात्याने त्यास प्रत्युत्तर केलें तर, ‘ शिकून शिकून शेवटी तू पुरुषी वळणावर गेलीस’ असेंहि म्हणावयास तो चुकत नाही. ही गोष्ट तो मुद्दाम करतो असें नाही. पण बायको ही एकंदरींत आपल्याला डावीच असली पाहिजे, उजवी होतां कामा नये, असले संस्कार आज कित्येक वर्षे पुरुषी मनावर झालेले आहेत. या संस्कारामुळे बायको जशी नवऱ्याच्या मोठेपणाचें सहज स्वभावानें कौतुक करते तसे पुरुषाच्या हातून होत नाही.

“आमचा संसार” या पुस्तकांत श्री. र. गो. सरदेसाई यांनी जुन्या व आधुनिक काळांतील स्त्रियांचा आपल्या पतिकडे पहाण्याचा दृष्टिकोन स्पष्ट केला आहे. माझ्या म्हणण्याचा भावार्थ श्री. र. गो. सरदेसाई यांच्या सुसंस्कृत आणि नवमतवादी लेखणीतून सुंदर चित्रित केला गेला आहे. ते म्हणतात, “पतीच्या व्यक्तित्वांत विलीन होण्याच्या स्त्रीस्वभावामुळें बायकांना स्वतःच्या आवडीनिवडी, हौशी टाकून द्याव्या लागल्या आहेत हें प्रत्येक स्त्रीच्या पुस्तकांत दिसून आलें आहे. पण पत्नीसाठीं पतीनें

आपल्या आवडीनिवडी अशा प्रकारें जाणिवेने टाकल्याचे उदाहरण नाही. संसारांत सर्व प्रकारचा त्याग स्त्रीलाच करावा लागतो आणि तोहि पतीच्या मुर्वतीसाठी, ही परिस्थिति फारशी बदलली नाहीं हेंच या पांचहि समारा-पासून आपणांस दिसून येते. ”

स्वभाव हा शिक्षण, संस्कार, परिस्थिति इत्यादि गोष्टींनीं बनत असतो, हें जर खरें असेल, तर शिक्षण, संस्कार व परिस्थिति याच्यात बदल होतांच स्वभावांतहि कांही प्रमाणांत तरी बदल घडणे शक्य आहे ही गोष्ट अगदी उघड आहे. या तीनहि बाबतीत थोडा थोडा फरक पडत गेल्यानें स्त्रीच्या व्यक्तिमत्वाचा विकास, सुधारक पुरुष बोलून दाखवीत असत तितका झाला नाही हे खरे. पण ज्याचा झाला त्यांच्या पतीना तो मानवला नाही. स्त्रीशिक्षणाने तिच्या बुद्धीचा व मनाचा विकास होऊं लागला. पुरुषांनीच तो व्हावा असा प्रयत्न मनापासून केला. पण त्याचवेळी पुरुषी हुकुमशहा त्याना सोडून दूर गेला नाही. हुकुमशहानें त्यांच्यावर सतत पहाराच ठेविला. “ मला सोडून तूं राहशील तर तुझ्या उच्च स्थानापासून तूं च्युत होशील ” असा इशारा तो जणुं देत होता.

हा हुकुमशहा जुन्या स्त्रियांनां मानवत होता व अलिकडील स्त्रियांना मानवतो असे नाही. आपण आपल्या पतीचें ऐकावें असे कोणत्याहि प्रेमळ पत्नीला वाटतेच. पण याचा अर्थ असा नव्हे की त्याची अरेरावी तिला आवडते. पतीने सांगितलेले, आपल्याला पटत नसतांना, शब्दशः आज्ञापालन करावे, असे कोणत्याहि स्त्रीला वाटत नसते. पण तरीहि ती ऐकते याचें कारण आपले हसे होऊं नये, आपला बेबनाव दिसूं नये याची काळजी पुरुषापेक्षा स्त्रीला अधिक वाटते. पुरुष आपल्या व्यक्तिगत मानाला जपत आला आहे. त्यासाठीं पत्नीचा अपमान झाला तरी तो पर्वा करीत नाहीं. पण स्त्रीचे तसे नाही. तिला स्वतःचा मान राखून घेण्यासाठी पतीचा मान राखावा लागतो. पतीचा अपमान तो आपलाहि अपमान असें समजण्या-इतकी ती त्याच्याशीं समरस होते. पण पुरुषाचा मानापमान स्वतंत्र असतो. म्हणून गृहछिद्रें दिसूं नयेत याची सहाजिकच काळजी तिला अधिक घ्यावी लागते. आणि ती घ्यावी लागते म्हणून ‘ डोळ्यांत आसूं आणि ओठावर हंसूं,’ असलें उसने अवसान तिला आणावें लागतें. संसाराचा

उणेपणा झाकण्याच्या स्त्रीवृत्तीमुळेच सौ. आनंदीबाई कर्वे यांच्यासारखी सडेतोड विचारसरणीची स्त्रीहि अखेर म्हणते की "मान सांगावा जनांत आणि अपमान ठेवावा मनात."

सगळी अवहेलना सोसूनहि स्त्री पतीचे समाधान करीत रहाते याचे बलवत्तर कारण असे आहे की पतीशिवाय समाजात तिला स्वतंत्र स्थान उत्पन्न झालेले नाही. पतीशिवाय तिला संरक्षण नाही. पत्नी हीमुद्धा पतीच्या नीतीमत्तेची ढाल असली तरी जी स्त्री पतीच्या जवळ कसल्याहि अवहेलनेंत रहाते ती अभेद्य तटबंदीच्या किल्यात असल्यासारखी सुरक्षित असते. या किल्याबाहेर तिचे पाऊल पडले तर समाज तिला सुखाने जगूं देत नाही. या स्वातंत्र्यांत ती इतकी परतंत्र होऊन जाते की त्यापेक्षा पारतंत्र्यातील स्वतंत्रता हजारपटींनी बरी असे तिला वाटू लागते.

हा दोष केवळ तिच्या दुबलतेचा नाही. सामाजिक मनोवृत्तीचाहि भाग त्यात आहेच. सुधारणा झाल्या आणि होत आहेत; पण केवळ परिस्थितीनें नाडले या गरजेपोटी होत आहेत. विचारानें, अंतःस्फूर्तीनें त्या झाल्या नाहीत. म्हणून पोशाख बदलला पण मने फारशी बदलली नाहीत असे झाले आहे.

आजच्या काळातहि आपला नवरा शहाणा, कर्तृत्ववान आहे असा अभिमान जेव्हां स्त्री बोलून दाखविते तेव्हां तिचाहि शहाणपणा उजळून निघतो, आणि हे खरेच आहे. आपला नवरा शहाणा कर्तृत्ववान् आहे असें म्हणतांना आपण मात्र मूर्ख, कर्तृत्वशून्य आहोत असला वैषम्यपूर्ण कमीपणा तिला कधीच वाटत नाही. नवऱ्याचे अवगुणमुद्धा गुण समजणारी आणि 'असे पति देवचि ललनाना' म्हणणारी सिंधु आता जुन्या जमान्यांत जमा झाली असल्याने, नवऱ्याचे अवगुणसुद्धा अंधश्रद्धेने भजणारी स्त्री नवीन तरुणींत आढळणे कठीण आहे हे खरे. 'स्वपतिच्या अंगिच्या दोषां। गणिति गुण मधुर आर्ययोषा॥' असली अंधभक्ति ठेवून, योग्य प्रतिकाराचा मुळीच प्रयत्न न करता, सहनशीलतेचा अतिरेक करून शेवटीं प्रत्यक्ष संसारांत जी अपयशी ठरली, जिनें दुबळेपणाची सहनशीलता म्हणजे स्त्रीचें सर्वात मोठे सामर्थ्य, अशा समजुतीने मुलासकट स्वतःच्या सर्वस्वाचा नाश उघड्या डोळ्यांनीं पाहिला आणि अखेर डोळे मिटले, त्या सिंधूचें उदाहरण

हल्लींची तरुणी आपल्यासमोर आदर्श म्हणून ठेवावयास धजावत नाही ही समाधानाचीच गोष्ट आहे.

पण ही अन्धभक्ति अलीकडील स्त्रीजवळ नसली तरी नवऱ्याचा मोटे-पणा तो स्वतःचाहि गौरवच आहे असें समजण्याएवढी रसिकता ती सहज दाखविते. पुरुषाचें मात्र सहसा तसें होत नाहीं. आपल्या जन्माच्या जोडीदारा-कडे तो इतक्या खेळीमेळीने पाहूं शकलेला नाहीं. जन्मभर स्त्रीशी समरस होऊनहि स्त्रीत्व म्हणजे अबलत्व हे तो विसरूं शकत नाही. आणि हा केवळ त्याचाहि दोष नव्हे. आम्ही स्त्रियांनीच आजपर्यंत अबलत्व उराशी कवटाळून धरलें. आम्हीच आमचे सामर्थ्य अजमावले नाही. त्यामुळेंच स्त्री ही प्रत्येक गोष्टीत आपल्यावर अवलंबून राहणारी आहे असे संस्कार पुरुषा-च्या मनावर झाल्यास तो दोष केवळ पुरुषाचा नव्हे.

पण आता स्त्रिया शिकूं लागल्या. त्यांना कांही गोष्टी समजूं लागल्या. त्यांच्या अपेक्षा वाढूं लागल्या. थोड्या फार प्रमाणांत स्त्रियांतील गुण पुरुषा-च्या बरोबरीनें प्रगट होऊं लागले, तेव्हां आतां पुरुषानेहि स्त्रीच्या अंगी असलेल्या गुणाचा रास्त अभिमान बाळगण्याची वेळ आलेली आहे. यावेळी जर तो खेळाडू वृत्ति दाखविणार नाही तर आजची स्त्री पूर्वीसारखी गुडघ्यात मान घालून मूग गिळून रडत बसणार नाही. तिलाहि स्वाभिमानाची थोडी ओळख होऊं लागली आहे. न्याय—अन्याय समजू लागला आहे. आपल्यालासुद्धां स्वाभिमानी माणसासारखें जगतां आले पाहिजे असे तिला वाटूं लागले आहे. तिला समजूं लागलेल्या या गोष्टींची पुरुषाने उपेक्षा करून भागणार नाही. त्यानें आपल्याबरोबर तिलाहि या साऱ्या गोष्टीची माधुरी चाखूं दिली पाहिजे.

पुरुषाचा दोष, तो नवरा झाला म्हणून गुण होत नाहीं, दोषच ठरतो, हे जसे आजच्या स्त्रीने समजून घ्यावयास हवे, तसेच स्त्रीनें एखाद्या प्रांतांत आपल्या बुद्धीची चमक दाखविली तर लगेच आभाळाला हात टेकल्याचा गैरसमज तिने करून घेतां कामा नये. कोणतीहि गोष्ट टोकाला गेली म्हणजे तितक्याच जोरानें खाली आदळते. कोणत्याहि गोष्टीचा अतिरेक झाला म्हणजे त्यांतून विपरीत परिणाम निघूं लागतात. एवढ्यासाठी सारासार विचारांचा समतोलपणा हवा. म्हणून नवरा हा छडी उगारलेला शासनकर्ता

किंवा परमेश्वरासन्निध नेणारें दैवत, व बायको म्हणजे गरीब, अपराधी, परावलंबी स्त्री किंवा कपाटात ठेवलेल्या देवीच्या मूर्तीसारखी निष्क्रिय, स्वत्व नसलेली दगडी मूर्ती, असे स्त्रीपुरुषांच्या नात्याचे स्वरूप असतां उपयोगी नाही. ते तसें आजपर्यंत होते, अजूनहि बऱ्याच प्रमाणात शिल्लक आहे, म्हणूनच स्त्रीचा गुण हा तिचा बरचढपणा असा विपरीत अर्थ निघूं लागला.

पण स्त्रीपुरुषांची शैक्षणिक कार्यक्षमता समान झाल्यानतर, नवरा-बायकोचे नाते म्हणजे स्वामी आणि दासी असे न मानतां ते समान दर्जाच्या मित्रत्वाचे आहे, ही शिकवण आमच्या मनाला मिळाली पाहिजे. ती अजून आमच्या मनाशी निगडित न झाल्यानें, चालतां चालतां प्रत्यही मानापमानाचे खडे टोचूं लागतात आणि गाडी खटकल्यासारखें होते. पण जेव्हां स्त्रियांची कार्यक्षमता त्यांच्या त्यांच्या क्षेत्रांत आर्थिक स्वावलंबनाच्या स्वरूपानें प्रतीत होऊं लागेल, त्यांचा आत्मविश्वास अधिकाधिक वाढेल, तेव्हां पुरुषांनाहि पत्नीची सगत–सोबत ही खरीखुरी मित्रत्वाची वाटेल. आज वाटणारे क्षुल्लक मानापमानाचे प्रश्न आपोआपच नाहींसे होतील, असें होण्यासाठीच स्त्रीने आपलें आर्थिक स्वावलंबन अगोदर सिद्ध केले पाहिजे आणि पुरुषानेंहि तिच्या या नवीन गोष्टीचे सहर्ष स्वागत केले पाहिजे.

आर्थिक दृष्ट्या स्त्री स्वावलंबी झाली म्हणजे तिचे लक्ष संसारांत राहणार नाहीं, मुलाबाळाची ती अनास्था करील, असें भय कित्येकाना वाटतें. पण शहाण्या स्त्रीच्या हातून असें होणें कसें शक्य आहे ? बालसंगोपन ही जबाबदारी सर्वस्वी पुरुषावर अवलंबून नसतानासुद्धां नोकरीचें काम संपतांच त्याची पावलें घरच्या दिशेने आपोआप पडतातच कीं नाही ? बायको-मुलांच्या सहवासांत आपला वेळ जावा, त्यांना काय हवे नको याची विचारपूस करावी, त्यांच्यावर प्रेम करावे आणि त्यांच्या प्रेमाचे सौख्य आपण उपभोगावें, अशी तळमळ, अशी ओढ पुरुषाला, बाहेरचे व्यवसाय करूनहि, लागतेच कीं नाहीं ? मग ती स्त्रीलाच तेवढी लागणार नाहीं हे कसें शक्य आहे ? अपत्यसंगोपन, कौटुंबिक वात्सल्य, सांसारिक हौस, ह्या भावना निसर्गतःच स्त्रीच्या स्वभावांत अधिक आहेत, त्या ती भावना आपल्याच पायांनी तुडवील ही भीति केवळ काल्पनिक आहे.

जी स्त्री बुद्धिवैभवानें आपल्या आयुष्याला सार्थकता आणूं इच्छिते, स्वतःच्या बुद्धीचा विकास व्हावा म्हणून धडपडते, ती आपल्याच मुलांची आबाळ करणे कधींहि शक्य होणार नाही. जी स्त्री बुद्धिमान् आहे तिला आपली जबाबदारी सांभाळण्याची समजूत केव्हांहि असणारच, गिरणींत किंवा घरगुती कामधंदे करणाऱ्या मजुरिणी यांचे किती तास द्रव्यार्जनासाठी खर्चीं पडतात? आटआठ तास त्या कामे करतात आणि पैसे मिळवितात; म्हणून कांही त्यांचे आपल्या मुलांवरील, संसारावरील प्रेम कमी होत नाही. मग ज्याना द्रव्यार्जन करणे जरूर आहे अशा पांढरपेशा स्त्रियांहि आपल्या संसारांसाठी आर्थिक मदत करूं लागल्या तर त्यांचें संसारांतील लक्ष कमी होईल या म्हणण्याला काय आधार आहे?

शिवाय दुसरी एक गोष्ट अशी आहे कीं एखादी स्त्री मुलांना घरांत कोणावर तरी सोपवून नोकरीसाठी बाहेर गेली तर त्या मुलाच्यावर कोणा तरी माणसाचें व्यवस्थित लक्ष राहीलच याची खात्री देतां येत नाहीं. पण ज्या मुलांना सांभाळणे जरूर आहे त्याची सोय खात्रीपूर्वक व्हावी म्हणून यापुढे मुलें सांभाळण्याच्या संस्था उघडणे अत्यंत जरूर आहे. ही एक नवीनच योजना अंमलांत आली म्हणजे त्यांतहि कित्येक स्त्रियांना काम मिळेल. मुलें असणाऱ्या पण नोकरीवर जाणाऱ्या स्त्रियांहि निर्धास्तपणें नोकरीवर जाऊं शकतील. आणि आज जी मुलांची आबाळ झालेली दिसते ती यापुढें होणार नाही.

पण हें जरी खरें असलें तरी जरूर म्हणून नोकरी करणाऱ्या स्त्रीच्या घरांतील मंडळीनी तिच्या घरकामासंबंधींची अपेक्षा पूर्वी इतकी ठेवून चालणार नाहीं. दिवसभर काम करून ती दमून जाते, तिलाहि विश्रांतीची गरज असतेच ना! दिवसभर काम करून थकल्यानंतर घरकामाचा उत्साह तिला तरी कोठून वाटणार? घरांतली व बाहेरचीं दोन्ही कामें ती हिरिरीने करील तर तिच्या प्रकृतीवर त्याचा विपरीत परिणाम झाल्याशिवाय रहाणार नाहीं. आणि असा ताण पडून प्रकृति बिघडते असा अनेक नोकरी करणाऱ्या स्त्रियांचा अनुभव आहे.

हें ध्यानांत घेऊनच तिच्या घरकामासंबंधीं अपेक्षा ठेवावयास हव्यात. पारशी युरोपिअन मुली नोकऱ्या करतात आणि घरचेंहि करतात. पण

त्याची घरगुती कामें आणि आपली कामे यात फार तफावत असते. स्वयंपाकघरांत त्यांचा वेळ आमच्या इतका जात नाही. आमचा स्वयंपाक आणि त्यांचा यांत फरक असतो. आमच्याकडे आर्थिक मदतीसाठीं स्त्री जेव्हां नोकरी करते तेव्हां तिच्याकडून तिला न झेपेल अशा घरकामाची अपेक्षा कुटुंबांतील मंडळींना धरून चालणार नाही ही समज घेतल्यास नोकरी करणाऱ्या स्त्रीच्या घरकामासंबंधी आजच्या इतक्या तक्रारी करण्याचें कारण उरणार नाही. नाहीतर पुरुषांनीं भरपूर पैसा मिळवून तिला नोकरी करण्याचा प्रसंगच येऊं देऊं नये म्हणजे झाले. तिनें पैसा तर मिळवला पाहिजे. पणतिनें आपल्याप्रमाणें स्वास्थ्य मात्र उपभोगतां कामा नये. अशी आडमुठी इच्छा ठेऊन कसे चालेल ?

स्त्रियांच्या बुद्धीला वाव मिळाला पाहिजे असें मी म्हणते तेव्हां विचारांची थोडीशी गल्लत होण्याचा संभव आहे; म्हणून जरा स्पष्ट करून सांगतें. स्त्रियांनीं चूलमूलच्या पलीकडे जाऊं नये असें आजवर आपण मानीत आल्यामुळें बुद्धिमान स्त्रियाचे व सामान्य बुद्धीच्या स्त्रियाचे अशा दोघींचेंहि नुकसान झालेले आहे. विशेष बुद्धिमान स्त्रियांच्या बुद्धिविकासाला आपण वावच दिलेला नाहीं, आणि कमी बुद्धीच्या स्त्रियांना बुद्धिमत्तेच्या एका विशिष्ट किमान मर्यादेपर्यंतहि आपण पोचूं दिलेलें नाही. एवढयाचसाठी कोणतीहि सामान्य स्त्री, ही कोणत्याहि सामान्य पुरुषाच्या पातळीवर यावयास हवी. आणि कोणत्याहि बुद्धिमान् स्त्रीच्या शिक्षणाला भरपूर वाव मिळावयास हवा. असें झाल्यानें सामान्य स्त्रीच्या आयुष्याचें दैन्य नाहीसें होईल आणि बुद्धिमान् स्त्री ही कर्तृत्ववान ठरल्यानें तिचा वैयक्तिक विकास तर होईलच, पण शिवाय आपल्या समाजाचें, राष्ट्राचें ती भूषण होऊन बसेल. हा त्या राष्ट्राचा आणि समाजाचाहि तिच्याबरोबर गौरवच आहे. आणि असेच व्हावयास पाहिजे.

कोणत्याहि सामान्य स्त्रीनें आपली बौद्धिक पातळी वाढवून घेतली, स्वतःच्या आयुष्यापुरती ती स्वावलंबी झाली म्हणजे कांहीं ती संसार सोडून निघून जात नाहीं. कारण, आपला संसार अधिक सुखाचा, अधिक स्वावलंबनाचा व्हावा यासाठींच तिची सारी धडपड असते. आणि जी स्त्री जीवनाच्या विविध क्षेत्रांत आपली विशेष बुद्धिमत्ता दाखवील तीहि संसाराचा त्याग करून जाईल असें समजण्याचें कारण नाहीं. कारण, बुद्धिमान्

स्त्रीहि बुद्धिमान् पुरुषाप्रमाणेच प्रथमतः माणूस असते सामान्य स्त्रीपेक्षां तिचें मन निराळ्या क्षेत्रात काम करीत राहिले, तरी संसार करण्याची इच्छा, अपत्यप्रेम, या भावना इतर स्त्रियांप्रमाणेच तिच्या ठिकाणींहि असतातच. मग आपले व्यवसाय साभाळूनहि ती सांसारिक जबाबदाऱ्या पार पाडल्याशिवाय कशी राहील ?

यापुढील काळ हा व्यक्तिविकासाचा आहे. स्त्री ही वस्तु नसून व्यक्ति आहे. पुरुषाप्रमाणेंच मन, भावना, विचार असणारी माणूस आहे, याची संपूर्ण जाणीव आजच्या समाजाने सतत ठेविली पाहिजे. ती ठेवली नाही तर जागी झालेली स्त्री हा अन्याय सहन करणार नाही, आणि त्याचे परिणाम तिच्या संसारावर, म्हणजेच तिच्याबरोबर विवाहबद्ध झालेल्या पुरुषाच्या संसारावर, झाल्याशिवाय राहणार नाहीत. निसर्गतःच स्त्री ही पुरुषापेक्षां शरीराने नाजुक असतांनाहि तिनें व्यक्तिविकासाची मागणी करावी हें अनेकाना पसत पडत नाही. कारण संरक्षण म्हणून स्त्रीला पुरुषाचा आधार घ्यावा लागतो, असे असतांना व्यक्तिविकासाच्या गप्पा स्त्रीनें कशाला माराव्या, असें त्याचें म्हणणें. पण स्त्रीच्या आरोग्याकडे आजच्यापेक्षा जास्त लक्ष पुरविले गेले तर उद्या ती आजच्यापेक्षां स्वसंरक्षणार्थ जास्त समर्थ होईल. शिवाय स्त्रीचे संरक्षण म्हणून तिला जशी पुरुषाच्या आधाराची जरूर आहे, तशीच पुरुषालाहि तिची जरूर आहे. आयुष्यांतील जोडीदारीण म्हणून स्त्रीच्याच मित्रत्वाचा अंगिकार केल्याशिवाय पुरुषाच्या आयुष्यालाहि जोपर्यंत पूर्णत्व येऊं शकत नाही; तोपर्यंत पुरुष हा स्त्रीचा आधारस्तभ आहे अशी खोटी प्रौढी मारण्यांत कांहीच अर्थ नाही.

स्त्री आणि पुरुष हे एकमेकाचे शत्रु किंवा गुलाम नसून एकमेकांचे जिवलग मित्र आहेत, आयुष्याचा आनंद उपभोगण्यांत एकमेकांचे सारखेच भागीदार आहेत, एकमेकांना सारखेच पूरक आहेत, ही समजूत जर लक्षांत घेतली तर कोण कोणाचें रक्षण करतो असले निरर्थक प्रश्न उत्पन्न होणार नाहींत. आयुष्यभर जी मैत्रीण आपल्या सुखदुःखाची भागीदार होऊं इच्छिते तिच्या व्यक्तिविकासाच्या आड येण्याचा अडाणीपणा कोणत्याहि समंजस पुरुषानें करता कामा नये. कारण स्त्रीला कांही प्रमाणांत जरी पुरुषाच्या आधाराची जरूरी असली तरी ती कांहीं एकादी निर्जिव वस्तु

नाही उलट ती हाडामांसाची माणूस आहे, तिलाहि मन-भावना आहेत आणि म्हणूनच तिच्या संरक्षणाचा प्रश्न उत्पन्न झाला. मग जिला मन, भावना, विचार हे पुरुषाप्रमाणेच आहेत तिच्या गुणांचा विकास व्हावा, जीवनानंद, उपभोगण्याच्या सवलती तिलाहि मिळाव्या आणि तिचें परावलंबन जाऊन ती अधिक स्वावलंबी व्हावी असें वाटणे हेच स्वाभाविक नाहीं काय ?

" नोकरी करणाऱ्या स्त्रिया कामांत नाना तऱ्हेचे घोटाळे करून ठेवतात " अशा अर्थाचे उद्गार कधी विनोदाने व कधी उपहासाने काढलेले आपणांस ऐकू येतात. असे घोटाळे होतात हें आजच्या घटकेला कदाचित् खरेहि असेल पण एवढ्यावरून स्त्रियांना ही कामे जमणारच नाहीत असा निष्कर्ष काढणें उतावीळपणाचे आहे. कारण ज्या ज्या राष्ट्रांत स्त्रियांच्या शिक्षणाला वाव मिळाला त्या त्या राष्ट्रांत स्त्रिया बौद्धिकच काय पण शारीरिक गोष्टीतहि बरोबरीने कामे करीत असल्याचे दृश्य आज दिसत आहे.

* १९२२ साली रशियांत सर्वात मोठ्या कार्यकारी प्रतिनिधींत फक्त ५ स्त्रिया होत्या. आणि आज २७७ स्त्रिया निवडून आल्या आहेत. राज्ययंत्रामध्ये पुष्कळशा स्त्रिया मुख्य जबाबदारीच्या कामावर आहेत. रशियांत झारशाहीत न्यायदानाचे काम स्त्रीला करता येत नसे. पण आतां १४ स्त्रिया सरन्यायाधीश आहेत. १९३९ साली ४४ स्त्रिया एंजिन ड्रायव्हर होत्या आणि लेनिनग्राडमध्ये २३००० स्त्रिया एंजिनियर होत्या. १९४३ साली रशियांत शेतकी काम करणाऱ्या स्त्रियांचे प्रमाण शेंकडा ७० होतें. कारण सर्व पुरुष लढाईवर गेले होते. आज आरोग्यखात्यांत एक लक्ष स्त्रिया काम करीत आहेत. १९१७ सालीं फक्त एक हजार स्त्रिया डॉक्टर होत्या. आज ३५ हजार स्त्रिया शास्त्रीय संशोधन करीत आहेत.

हें कशाचें फळ आहे ? आणि या साऱ्या स्त्रियांनी काय आपले संसार वाऱ्यावर उधळून लाविले आहेत ? आज आम्हांला एखादी गोष्ट अवघड वाटत असली तर तो दोष आमचा नाही. ज्या गोष्टीची संवय नाहीं

* वरील माहिती सोव्हिएट वीकलीवरून घेतली आहे.

आणि जी नवीन असते ती आंगवळणीं पडेपर्यंत व जुनी होईपर्यंत आत्मसात् होत नाहीं, हें पुरुषाच्या किंवा स्त्रीच्या--कोणाच्याहि बाबतीत सारखेंच आहे. त्यात नवल वाटण्याचें कारण नाही. आणि तेवढ्यावरून एखादा चुकीचा निष्कर्ष ठोकून देणे घायकुतेपणाचें आहे. पाश्चात्य देशांतील स्त्रिया जे आज करूं शकतात ते आम्हींहि उद्यां करूं शकूं. तशी सोय आणि तशी संधि मात्र आम्हांला मिळावयास पाहिजे हेच तर आमचें म्हणणें आहे.

मात्र आर्थिक स्वावलंबनाच्या कल्पनेने वेडावून जाऊन स्त्रियांनी घरच्या कामाचा बोजवारा उडवता कामा नये. उलट सुशिक्षित स्त्रियांवर घरकाम अधिक व्यवस्थित करण्याची जास्त जबाबदारी आहे. "शिकलेल्या बाईला कुठले येणार स्वयंपाकपाणी !" असे म्हणणारे पुष्कळ लोक समाजात आढळतात. क्वचित् ठिकाणी ते खरेंहि असेल. पण या आक्षेपाला खरोखरी फारसे महत्त्व देण्याचे कारण नाही. कारण शिकलेल्या, पैसे मिळवणाऱ्या सर्वच स्त्रिया घराची धर्मशाळा करून टाकतात असे मुळीच नाही. आपलें घर नीटनेटकें व्यवस्थित, आकर्षक दिसावे आणि त्यासाठी सतत धडपड करावी हा स्त्रीचा सहज स्वभाव आहे. नोकरी करणाऱ्या कितीतरी स्त्रियांची घरें आरशासारखी लखलखीत आणि अत्यंत व्यवस्थित असलेली आपणांस दिसतात.

सांसारिक कामाची हौस, उत्साह, उमेद या सर्व गोष्टी केवळ शिक्षणावर मुळींच अवलंबून नाहीत. जिला आळस नाही, आणि उत्साहानें जिचें मन फुलून गेलें आहे ती सुशिक्षित किंवा अशिक्षित, मिळवती किंवा न मिळवती कशीहि असली तरी आपल्या संसाराची शोभा वाढविण्यासाठीं सारखीच धडपड करील. या गोष्टी बहुधा स्वभावावरच अवलंबून असतात, केवळ शिक्षणावरच नाहींत. पण शहाणपणाने वागण्याची जबाबदारी केव्हांहि शिकलेल्या माणसांवरच जास्त पडणार. म्हणून मी मुद्दाम म्हणतें की स्त्रियांनी आपल्या घरकामाच्या विभागांत कोणालाहि बोलण्यास जागा ठेवूं देतां उपयोगी नाहीं. पण शिक्षणानें आपली कार्यक्षमता मात्र वाढवून घेतली पाहिजे.

• • •

# आमचे विवाह : : ४

विवाह हा विषय एकट्या स्त्रीचा होऊं शकत नसल्यानें या विषयावर केवळ स्त्रियांच्याच दृष्टिकोनांतून लिहिणे अशक्य आहे. म्हणून या विषयापुरते माझे विचार मी तरुणतरुणींचा अंतर्भाव करूनच मांडणार आहे. स्त्रीपुरुषांना एकमेकांचें आकर्षण वाटणे, संतति निर्मिति होणें, ही एक नैसर्गिक गरज आहे. जी गोष्ट नैसर्गिक गरजेची असते, ती टाळून जगणे माणसाला शक्य होत नाही. देहधारणेसाठी अन्न मिळविणें, संरक्षण म्हणून कळप करून राहणे व नैसर्गिक गरज म्हणून संतति निर्मितीचे कार्य होणे, अशा तऱ्हेच्या नैसर्गिक गरजा माणसाच्या व पशूच्याहि सारख्याच आहेत.

पण माणूस हा जगातील सर्वात बुद्धिमान् प्राणी असल्यानें, माणसाच्या नैसर्गिक गोष्टी या पशूंप्रमाणेच न घडतां, ज्यामुळे माणसाचें बुद्धिवैभव प्रत्ययास येईल, माणसाची माणुसकी दिसून येईल, व ज्यामुळे माणसाच्या सुखांत भर पडून सामाजिक स्थैर्य व संरक्षण प्राप्त होईल, अशा तऱ्हेचे नीतिनियम, बंधनें माणसानें स्वतःवर घालून घेतली. नाही तर अगदी प्राचीन काळी कच्चें मांस खाऊन माणसें जगत होती; आणि वाटेल त्या स्त्रीचा वाटेल त्या पुरुषाशी संबंध येत होता. पण माणूस हा इतर प्राण्यांहून स्वभावतःच कल्पक असल्यानें, नाना प्रकारचें अन्न शिजवून खाण्याची कल्पना त्याच्या डोक्यांतून निघाली; आणि माणसाच्या आयुष्याबद्दल, राहणीबद्दल तो जास्त कल्पना लढवूं लागला. माणसाच्या आयुष्यांत केवळ शरीरधर्माला महत्त्व नाहीं, तर माणसांत मानसिक प्रवृत्ति इतर प्राण्यांहून फार मोठ्या प्रमाणात आहेत, याची माणसास जाणीव होऊ लागली. आपण केवळ शरीरानें जगणारे नसून मनानेंहि जगणारे प्राणी आहोत, याची माणसाला जास्त जाणीव होऊं लागली. स्त्रीपुरुषांच्या शरीरसंबंधांतहि, केवळ शारीरिक गरजेलाच महत्त्व न राहतां, आपापल्या जोडीदाराच्या सहवासाचें, स्वभावसादृश्याचें व मानसिक साधर्म्याचे आकर्षण व महत्त्व वाटूं लागलें.

प्रेम हें केवळ शारीरिक असूं शकत नाही, ते स्वभावाच्या सारखेपणामुळें मानसिकहि असतें; एवढेच नव्हे तर मानसिक आकर्षणांतून शारीरिक आकर्षण निर्माण होतें. हे जेव्हा माणसास समजले तेव्हां, जी व्यक्ति आपणास मनानें व स्वरूपाने आवडते, ज्या व्यक्तीच्या सहवासाची ओढ आपणास व्याकूळ करते, आणि ज्या व्यक्तीच्या सान्निध्यांत आपण सुखी होऊ अशी आशा मनांत उत्पन्न होते, ती व्यक्ती जन्मभर आपलीच रहावी, त्यासाठी आपणहि तिच्याशीं एकनिष्ठतेनें रहावे, अशी प्रामाणिक इच्छा, अशी माणूसकीची कल्पना माणसाच्या मनांत उत्पन्न झाली. आणि ज्या दोन व्यक्ती एकमेकांवर लुब्ध असतील, त्यांपैकी कोणाचीहि अभिलाषा तिसऱ्या माणसानें करतां कामा नये, असे त्यास वाटू लागले. तेव्हां माणसाच्या प्रेमाला संरक्षण म्हणून त्याने विवाहसंस्था अस्तित्वांत आणिली आणि नीतिनियमांची बंधनें घालून घेतली. त्यामुळे समाजाला स्थैर्य आलें व संरक्षणहि मिळाले.

विवाहसंस्था अस्तित्वात येण्याची आणखीहि दोन प्रमुख कारणे आहेत. शारीरिक वासना ही माणसाची कायमची गरज आहे. पण वासनापूर्तीसाठी माणसांनी गोंधळ घालून वासनांच्या आहारी जाऊ नये; मात्र या वासनापूर्तीला, माणुसकीला धरून कायद्याचे संरक्षण मिळावे, असे विचारवंतांना वाटूं लागले, म्हणून विवाहसंस्थेची जरूरी उत्पन्न झाली. दुसरे असें की, पशुपक्षांची संतति जशी जवळ जवळ जन्मल्यापासून स्वावलंबी असते तसे माणसांच्या मुलांचे नसते. शिवाय माणसांच्या मुलांना केवळ शारीरिक संरक्षण देऊन भागत नाही, तर त्यांना चालू समाजात रुळता येईल इतपत कार्यक्षम करण्याची जबाबदारी आईबापांवर असते. म्हणून कुटुंबसंस्थाहि विवाहसंस्थेबरोबरच अस्तित्वांत आली.

पण आपसांतल्या प्रेमसंबंधाला एकनिष्ठतेचा प्रामाणिकपणा असावा व आपल्या प्रेमसंबंधाला कायद्याचे संरक्षण मिळावे, हा जो विवाहसंस्थेचा हेतु, तो आजची आपली विवाहपद्धति ध्यानात घेता तडीस जातो असे म्हणावेसे वाटत नाही. कारण माणसाच्या प्रेमाला संरक्षण मिळावे हा जो मूळ हेतु त्या प्रेमाला आजच्या विवाहात कोणीच विचारीत नाही. आजचे विवाह हे प्रेमासाठी होत नसून ‘ विवाह करा आणि मग प्रेमाचें आपसांत बघून घ्या ’ हें सांगण्यासाठी होतात. आणि मग प्रत्यक्षांत प्रेम उत्पन्न होतें किंवा नाही याची

कोणीच दखल घेत नाही. ज्यांच्या गांठी एकदा बांधल्या गेल्या, त्याच्यांत प्रेमाचे संबंध निर्माण झालेच आहेत असे आम्ही गृहीत धरून चालतो. असें एकदां गृहीत धरलं म्हणजे एकनिष्ठपणा व प्रामाणिकपणा ही बंधनेंहि पाठोपाठ आलीच. सध्येतला अर्थ निघून गेला आणि जानव्यांत हात अडकवून पुटपुटण्याचं तंत्र मात्र शिल्लक राहिलें.

प्रेमाला स्थैर्य लाभण्यासाठी साधन म्हणून एकनिष्ठतेची जरूरी उत्पन्न केली तर आज साधन हेंच साध्य होऊन बसले; आणि त्याच्यावरच आम्हीं इतका भर दिला की विवाहाला प्रेमाची जरूरी आहे ही गोष्ट आम्ही अजिबात दृष्टीआड केली. याचासुद्धां इतका अतिरेक झाला की, ज्या दोन व्यक्तींचें लग्न व्हावयाचे त्यांना स्वतःला खुद्द कांहींहि समजत नसतांना जवळ जवळ पाळण्यालाच बाशिंग बांधून आम्ही त्याच्या जन्माच्या गांठी मारून टाकल्या. आणि मग त्याच वेळीं असे गृहीत धरले कीं, ज्या अर्थी त्यांना नवराबायकोचें अधिकार–पत्र दिले आहे त्याअर्थी ते एकमेकावर प्रेम करतीलच. त्यांच्या या परस्पर प्रेमाची खात्री लोक बाळगीत होते. आणि खुद्द लग्न करणारीं माणसेंहि मोठीं झाल्यावर असे समजूं लागलीं कीं लग्न झालेंच आहे तर आतां आपणांस प्रेम करणेंहि भागच आहे. अशा पद्धतीच्या कांही विवाहांत प्रेम उत्पन्न झालेंहि, तर कांहीच्यावर ही प्रेम करण्याची बळजबरी केली गेली. म्हणजे माणसांचे विवाह प्रेमाच्या स्थैर्यासाठीच असतां विवाहासाठी विवाह असे त्याचे स्वरूप झालें.

बालविवाहात जसे विवाहासाठी विवाह झाले तीच स्थिति आता वधूवर प्रौढ झाले तरीहि कायमच आहे. मुले व मुली सुशिक्षित झाली तरी त्यांच्या विवाहाचे हेतु केवळ सौंदर्य, संपत्ति, मानमरातब व खोटा मोठेपणा हेच होऊन बसले. आणि एकमेकांची अनुरूपता, एकमेकाचे आकर्षण याला गौणत्व आले. गौणत्वच नव्हे, तर या महत्त्वाच्या गोष्टीचे अस्तित्वच नाहींसे होत चालले. श्रीमंताच्या मुलाना श्रीमंतांच्याच मुली वधू म्हणून निवडणें हा लौकिक नीतिशास्त्रांतला दंडक होऊन बसला. आणि सुस्थितीतील मुलासहि श्रीमंताची मुलगी वाघसिंहासारखी भयंकर मानणे भाग पडले.

पूर्वी शौर्यादि गुणांची कसोटी पाहून मुलींची स्वयंवरे होत असत. आतां मुलांमुलींनी स्वतःच्या लग्नाचे विचार स्वतःच्या डोक्यानें करणें हें अनीति-

कारक नी म्हणूनच गुन्ह्याचे ठरूं लागलें. पालक आपल्या मुलांमुलींची लग्नें आपल्या कल्पनेप्रमाणे करत आले आणि ही लग्नें अनुरूप न निघाल्यास लग्नाची बळजबरी सांभाळण्याची जबाबदारी मात्र वधूवरावर येऊन पडली. आपल्या मुलांची लग्नें मुलाच्या इच्छेप्रमाणे केली पाहिजेत, त्यांच्याच संमतीनें होणें जरूर आहे आणि ज्यांची लग्ने, त्यांच्या समाधानालाच यात प्राधान्य आहे, या गोष्टीचा पालकांना विसर पडूं लागला. ज्यायोगे आपली प्रतिष्ठा वाढेल, ज्या घराण्याशी संबंध जोडला गेल्यानें आपणास मोठेपणा प्राप्त होईल त्याच घराण्याशीं तो जोडावयाचा, या वरवरच्या खोट्या लौकिक कारणावरच पालकांनीं भर दिला.

या खोट्या अब्रूच्या नी भ्रामक नीतिअनीतिच्या कल्पनांच्या आहारी जाणें माणसाच्या इतके अगवळणीं पडले की लग्नासारखी नाजुक आणि जिव्हाळ्याची गोष्ट, पण तिचा आज बाजार होऊन बसला आहे. हुंडा किती देणार, मानपान कोणत्या पद्धतीने करणार यावरच लग्न करणे न करणे अवलबून राहिले. आणि मग बाजारांत भाजी पारखून घ्यावी तसे मुली पहाण्याचे समारंभ घरोघर होऊं लागले. अक्षरशः भाजी घेण्यांत माणूस जेवढा वेळ खर्च करतो तेवढ्याच वेळांत मुलीची परीक्षा होऊन बाकीचा सर्व वेळ, पैसा आणि शक्ति हीं मांडव, भटजी, पानसुपारी आणि जेवणावळ यांवरच खर्च होऊ लागली.

मुली पाहण्याचे समारभ बी. ए. झालेल्या मुलींच्या बाबतीतहि अजून होतच आहेत. मुलगा पाहण्याचा समारंभ मात्र नेहमीच होत नाहीं. मलाला मुलीचे वडील पाहून घेतात आणि ठरवून टाकतात की मुलाने मुलगी पसत केली तर आपण देऊन टाकावयाची. कारण मुलगा पसंत आहे की नाहीं हें मुलीनें ठरवावयाचेंच नसते. मुलगा मात्र आजपर्यंत शेरे मारीतच आला, 'नापास ! नापास ! नापास !'......आणखी मग कोणत्या तरी एका मुलीकडे बोट करून तो म्हणतो, 'पास !'

आणि मग एक दिल्लीचा मुलगा आणि पुण्याची मुलगी यांचे लग्न होतें- कारण अशी दूरची स्थळें पाहण्यांत म्हणजे ज्या वधूवरानी कधीं एकमेकाची तोंडेसुद्धां बघितलेली नसतात त्याच्या जन्माच्या गाठी मारण्यांत, आम्ही एक प्रकारे नीतिमत्तेचे रक्षण करीत आहोत अशी आमची भ्रामक

समजूत असते. आमच्या पलीकडच्या खोलीत एखादा अनुरूप वर असला तर त्याच्याकडे आम्ही ढुंकूनसुद्धां बघणार नाही; कारण ओळखीच्या माणसांचीं लग्नें होणे म्हणजे, नीतीची एक पायरी खाली घसरल्यासारखें आहे असें आम्हांस वाटते. एखाद्या घरांत प्रेमविवाह झाल्यावर तुम्ही त्या माणसांस विचारून पहा, 'काय हो, तुमच्या मुलाचा प्रेमविवाह झाला काय ?' तर त्याना लगेच त्यांत कमीपणा वाटेल आणि ती म्हणतील, 'छे ! प्रेमविवाह नाही ! आपली होती थोडीशी ओळख पूर्वीची.'

एखाद्या विवाहाबद्दल तुम्ही उद्गार काढा, 'एकमेकाच्या समत्तीनेच ही निवड झाली वाटतं ?' तर पालक मंडळी लगेच उसळून म्हणतील, 'छे छे ! आमच्या संमतीन नी आमच्या पुढाकारानं सर्व झाल. नवरानवरीची मुळींच लुडबूड नाहीं यांत.' म्हणजे वधूवर स्वतःच्या लग्नापासून जेवढे अलिप्त राहतील तेवढा आमचा सोवळेपणा पराकोटीचा, असा हव्यास आमच्या मनाचा आहे.

नीतीच्या या खोट्या कल्पना उराशी धरून, कित्येक पालकांनी आपल्या मुलाच्या प्रेमविवाहाला अत्यंत कसून विरोध केलेला आहे आणि त्याची कारणे कांही गंभीर होती असेंहि नाही. केवळ तो प्रेमविवाह आहे हेच एक कारण पुरेसें होऊन कित्येक मुलांना आजपर्यंत विरोध होत आलेला आहे. एवढेच नव्हे तर मुलानी स्वतः जमविलेली लग्ने, पालकानीं नाना खटपटी करून आपल्या हातांनी मोडून टाकली आणि आपण आणलेल्या माणसाच्या गळयात त्यांस बांधून टाकले. ज्या प्रेमासाठी विवाह करावा असे त्यास वाटत होत ते प्रेम उधळून टाकलें—आणि ओळखसुद्धां नसलेल्या माणसाबरोबर आयुष्य जखडून टाकण्याची जबरदस्ती त्यांच्यावर केली.

कांही उदाहहरणे तर अशी आहेत की स्वतः मुलींनी ठरविलेल्या लग्नाचे घोळ सात सात आठ आठ वर्षे पडून होते आणि अखेर आईबापांनी धाकदपटशा दाखवून ती लग्नें मोडून टाकली, एवढेच नव्हे तर कांही खोटे बोलून बनवाबनवी करून आपल्या मुली दुसऱ्या मुलांच्या गळयांत बांधून मोकळे झाले. अशा या जबरदस्तीच्या लग्नांत तिसऱ्या माणसावर विनाकारणच जुल्म होत असतो. आणि एकंदरीने आपल्या पसतीचे लग्न मोडलें म्हणून तरुण—तरुणी नाखुषच असतात. अशी लग्ने कितपत यशस्वी होतील हें

निराळे सागावयास नकोच. ती जोडपी एकत्र राहतात याचा अर्थ ती सुखी असतात असा नव्हे. आपण सुखी आहोत असा बहाणा त्यांना करावा लागतो; कारण आपले दैन्य झाकून ठेवावे हा माणसाचा सहजस्वभाव आहे. पण डोळसपणाने पहाणाराला त्यांची सांसारिक असंतुष्टता सहज दिसून येते.

लग्न हें केवळ शरीरसंबंधासाठींच आहे आणि शरीरसंबंध ठेवण्यास कायद्यानें संमति मिळावी, एवढा एकच हेतु डोळ्यांपुढें ठेवल्याने कोणतातरी एक मुलगा आणि कोणतीतरी एक मुलगी, यांना लग्नाचें अधिकारपत्र देण्यात येऊं लागले. यात स्वभावसादृश्याचा, मानसिक आकर्षणाचा, प्रेमाचा कांहींहि संबंध येणे शक्यच नसल्याने, एखाद्या मुलीला नवरा पाहून देणे हा एक कित्येकांचा धंदाच होऊन बसला. धंदा म्हटला म्हणजे दलाली, काळाबाजारहि आलाच. त्याला अनुसरून लग्नाचे भाव जमविताना मध्यस्थीच्या नांवाखालीं कित्येकांनी अक्षरशः आपले हात ओले करून घेतले. आजच्या काळांतही हे प्रकार राजरोस घडत आहेत आणि तरीहि अनोळखी माणसाचे आयुष्य एकत्र निगडित करण्याची जबाबदारी आणि धोका आम्ही पत्करीत आहोत.

पण यापुढे असे होता कामा नये. लग्नाच्या अनेक हेतूंत शरीरसुख मिळविणें हा एक आहे हे नाकबूल करून चालणार नाही. पण शरीरसुख हे आयुष्याचें सर्वस्व होऊ शकत नाही. लग्नाची पहिली चारपाच वर्षेच या गोष्टीला स्वाभाविकपणे जास्त महत्त्व असते. नंतर ती संसारातल्या अनेक गरजांपैकीच एक गरज आहे हे माणसास उमजूं लागते. पण माणूस नुसत्या शरीरसुखावर जगूं शकत नाही. त्याला आपल्या जन्माच्या जोडीदाराकडून केवळ शरीरसुखाचीच अपेक्षा नसते. परस्परविश्वास, एकमेकांबद्दलचें मानसिक प्रेमाचें आकर्षण, सहवासाची इच्छा, सहानुभूतीची व सहाय्याची गरज यांवरच माणसाचें खरें सुख अवलंबून असते. आणि यासाठीच वधू–वरांमध्ये स्वभावदृश्याची अत्यन्त गरज आहे.

जी माणसें मनानें एक होतात, मानसिक आकर्षणानें एकमेकाकडे ओढलीं जातात, त्याच्या बाबतीत शारीरिक आकर्षण आपोआपच निर्माण होत असते. पण ज्यांचे केवळ शरीरसंबंध घडले, आणि तो बहर संपला, त्याच्यात मानसिक आकर्षण निर्माण होतेंच असे नाहीं. आणि वैवाहिक

आयुष्य यशस्वी होणे हे शारीरिक आकर्षणाइतकेंच मानसिक आकर्षणा-वरहि अवलंबून असते. मनाने एकजीव झालेल्या जोडप्यांना प्रणय शिकविण्याची जरूरी नसते. पण जी मनानें हजारो योजने दूर असतात त्यांचे शरीरसंबंध हे केवळ नैसर्गिक गरज म्हणूनच होतात. त्यांच्या बाबतीत मनाची प्रसन्नता, उत्साह, प्रणयाची जादू ही, मानसिक आकर्षणा-च्या अभावी, भितीवरील चुन्यासारखी, केव्हांच उडून गेलेली असतात.

संसार सुखी होण्यास केवळ शारीरिक सौख्य पुरें पडत नाही. संसारांतील जोडीदाराच्या प्रेमाचा, सहवासाचा आनंद हा मनाने उपभोगावयाचा असतो. हे मानसिक समाधान ज्यांना लाभत असतें त्यांचे संसार हे खऱ्या अर्थाने टिकाऊ संसार होतात. मानसिक आकर्षणाच्या म्हणजेच आपसातील प्रेमाच्या बळावर संसारांतील भलेबुरे प्रसंग झेलून धरण्याचे सामर्थ्य त्यांच्यांत निर्माण होते. हें मानसिक आकर्षण ज्या स्त्रीपुरुषात निर्माण झालेलें नसते त्याचे सांसारिक आयुष्य, संतति निर्माण होत असतांही, पडक्या भिंतीसारखे भकास दिसते.

असे होण्याचे कारण हेच आहे की, आमचे सांसारिक आयुष्य आम्ही पशुपक्ष्यांसारखे केवळ शरीरसुखावर अवलंबून ठेवले. या सौख्याला संसारांत महत्त्वाचे स्थान आहे यात शंकाच नाही. पण संसारांत एवढी एकच गोष्ट नसते. रोजची भाजी आणणे, फिरायला जाणे, घराची शोभा वाढविणे, एखादे कार्य जोडीने करणें, अशा बारीक गोष्टीपासून तो मोठ्या गोष्टीपर्यंत प्रत्येक गोष्टीत एकमेकांना सहकार्याची गरज असते. आणि ही गरज आपसांत मानसिक आकर्षण असले तरच पुरी होणार. नाहीतर, "तुमचे तुम्ही पाहून घ्या" आणि "तुझे तूं पाहून घे", अशा वाक्यांवर सहकार्याची बोळवण होऊं लागते. यांतून कोणत्या प्रकारचें सुख निर्माण होत असेल याचा अंदाज घेणें अगदी सोपे आहे.

यांवर कित्येक माणसें म्हणतील की, "कांही असले तरी आमचे संसार झालेच कीं नाहीत?" पण मी म्हणेन—"ते झाले नाहींत. देवाधर्माच्या दडपणानें ते मुद्दाम केलेले आहेत."

पण आतां जुन्या पिढीचे दिवस संपत आले तसे देवाधर्माचे संस्कार जरा ढिले झाले आहेत. परमेश्वरानें सांगितलें, धर्मानें लिहून ठेविलें आणि रूढीनें

चालत आलें—असल्या बागलबुवांना आजची तरुण पिढी भिण्याचे नाकारूं लागली आहे. शिक्षणानें, वय वाढल्याने, लग्नाची वधूवरे आपापल्या विशिष्ट अपेक्षा धरून बसली आहेत. त्याना कुठे शंका येतात, कुठें बरोबर वाटतें, कुठे चूक वाटतें, कधी विचार करावासा वाटतो, आणि केव्हां केव्हा चिकित्सा केल्याशिवाय त्यांच्या मनाचे समाधान होत नाहीं. जी मनाने जगूं पहातात, ज्यांना लग्नाचा अर्थ शारीरिक आकर्षणाबरोबरच प्रेमाचें आकर्षण असा समजूं लागला आहे, त्याची लग्ने अनोळखी व्यक्तीशी लावून देणे हे एक भलतें धाडसच आहे. ज्याच्या आयुष्याची जबाबदारी आपण घ्यावयाची व आपले जीवन ज्याच्या स्वाधीन करावयाचे ती व्यक्ती ज्याच्या त्याच्या माहितीची पसतीची, असणे अत्यंत जरूर आहे. व या दृष्टीने मुलानी व मुलींनीहि स्वतःचे समाधान असल्याशिवाय कोणाच्याहि भिडेनें स्वतःच्या मनाविरुद्ध कधीहि लग्नास संमती देऊं नये. कारण, ज्याचें लग्न त्याच्या समाधानासच खरोखरी प्राधान्य आहे. ज्याचें त्याचें लग्न हे त्याच्या स्वतःसाठी त्याच्या सुखासाठी होत असते; होत नसेल तर व्हावयास पाहिजे. त्या मानाने आप्तेष्टाचें समाधान हा गौण प्रश्न आहे. आणि यासाठी यापुढे एकमेकाच्या संपूर्ण पसंतीनेच विवाह होणे जास्त इष्ट आणि जरूर आहे.

पण आजपर्यंतचा अनुभव असा आहे की पुराणांतरींच्या प्रेमाची कित्येक आख्याने मुलाना ऐकवूनहि त्याच्या लग्नाचे हक्क अजून पालकवर्गानें आपल्याच हातात ठेविले आहेत. पूर्वीच्या अल्पवयी, अशिक्षित मुलांमुलींना परस्परविषयक अपेक्षा ठेवण्या इतपत ज्ञानच नसे, आजची तरुण पिढी अनेक कारणांनी लग्नाची होईपर्यंत वयानें व शिक्षणाने वाढते आहे. तेव्हां वयानें मोठ्या व सुशिक्षित तरुण मुलांमुलीना स्वतःच्या लग्नाबद्दल कांहीं अपेक्षा असणें अगदीं साहजिक आहे. पण मुलांना आपण शिक्षण दिलें, वाढविलें. तेव्हां त्यांच्या संबंध आयुष्यावरहि आपलाच हक्क आहे असला दुराग्रह कित्येक पालकांच्या मनांत अगदीं घट्ट बसलेला असतो. त्यांच्या मुलांनी प्रेमविवाह जमविल्याचें समजतांच, आकाश कोसळून पडल्यासारखें आकांडतांडव ते करतात. घरांतून हाकलून देण्याच्या, जन्मभर नांव टाकण्याच्या, "तूं मला मेलीस, मी तुला मेलों" असल्या निर्वाणीची

भाषा बोलून, घरांतून एक कपर्दिकहि न देण्याच्या धमक्या दिल्याशिवाय ते रहात नाहीत. एवढेंच नव्हे तर जीव देण्याच्या धमक्याहि देतात. आपल्या स्वतःच्या मानमरातबाच्या अहंकारी खोट्या कल्पनांनीं भारून जाऊन आपल्या मुलाना आपण किती दुखवीत आहोत, मुलांच्या सुखदुःखाशीं, त्यांच्या आकांक्षांशीं समरस न होतां, नकळत त्यांचा आपल्याकडून कसा छळ होतो आहे, या गोष्टीची दखल पालक मंडळी पुष्कळ वेळा घेत नाहीत, हे नाकबूल करून चालणार नाही. कारण ही अनेक घरीं प्रत्ययास येणारी सत्य गोष्ट आहे.

'प्रेमविवाहातसुद्धा फसण्याचे प्रसग येतात, आणि लग्नाची अयशस्विता प्रत्ययास येते,' असे एखाद्या उदाहरणाकडे बोट करून प्रेमविवाहाविरुद्ध असणाऱ्या माणसांना म्हणतां येते. पण प्रत्येक लग्न यशस्वी होण्याची हमखास हमी, खात्रीचा उपाय, कोणत्याहि पद्धतीत आणि कोणत्याही काळात सुचवितां येणे अशक्यच आहे. लग्नाची पद्धत हें कांही एखादे पेटंट औषध नव्हे, की तें रामबाण म्हणून सांगतां येईल! आणि अयशस्वी प्रेम-विवाहाकडे बोट करतांना, जुन्या पद्धतीने हुंडा देऊन झालेल्या अयशस्वी, दुःखी लग्नाकडे बोटें दाखवितां येणार नाहीत असे थोडेंच आहे? पण ज्या पद्धतीत यश येण्याची अधिक खात्री आणि कमी धोका असेल तीच पद्धत स्वीकारणें हे अधिक शहाणपणाचे आहे.

प्रेमविवाहात स्त्रीपुरुष आपापल्या स्वभावाची वैगुण्यें लपवून ठेवितात आणि एकमेकांना आपली भुरळ पडावी अशी काळजी घेतात, असा एक आक्षेप प्रीतिविवाहावर येतो. आणि त्यामुळे फसण्याचा संभव जास्त असतो असे आक्षेपकांचें म्हणणें. आपला स्वभाव,आपल्या आवडीनिवडी, आपली सांपत्तिक परिस्थिति याची जास्तींत जास्त जाणीव एकमेकांस अगोदरच करून देणारी तरुण–तरुणी असतातच. पण क्षणभर हा आक्षेप खरा धरला तरी माणसाच्या स्वभावांत अजिबात वैगुण्य नसणें ही गोष्टच अनैसर्गिक आहे. स्वभावांत गुणांबरोबर दोष हे कुणाच्याहि असतातच. प्रीतिविवाहांत दोष उशीरा समजत असले तर गुण तरी आधी समजलेले असतात. आणि मग प्रेमामुळें दोष साभाळून घेण्याची शक्यता तरी असते. पण ज्या माणसाची कधीं ओळख नाही त्याच्या गुणावगुणांचा कसा निर्वाळा देणार? उलट

प्रीतिविवाहांत प्रेमामुळें दोषांवर पांघरूण घालण्याची प्रवृत्ति लौकर निर्माण होईल. आणि अनोळखी माणसाच्या बाबतीत मात्र प्रथम भेटीत त्याचे दोषच डोळ्यात भरले, त्याच्या बद्दलचें प्राथमिक मत वाईटच झालें तर त्याचे गुण डोळ्यांत भरणे हे सुद्धा अवघड होऊन बसते.

शिवाय कोणाचाहि स्वभाव म्हणजे गुणदोषांचें मिश्रण असले तरी कोणता स्वभाव आपल्या स्वभावाशीं जमणारा आहे हे समजण्याची संधी माणसास प्रीतिविवाहांत मिळते. प्रत्येकाच्या स्वभावात गुणदोषांचें मिश्रण असते, एवढ्या आधारावर वाटेल तो अज्ञात स्वभाव साभाळण्याची जबाबदारी एखाद्याच्या गळ्यांत बांधणें हे अडाणीपणाचे, असंस्कृतपणाचे लक्षण आहे. स्वभावाच्या अनेक तऱ्हा आणि अनेक जाती असतात. आणि त्या त्या स्वभावाशी जमणारे स्वभाव सांभाळणेंच कोणालाहि शक्य असते. शिवाय बऱ्याच गोष्टी आपल्या स्वभावाशी पटत नसतांना आईबाप, भाऊ किंवा असेच कोणी नातेवाईक याच्याशी जमवून घेणें, त्याचे स्वभाव संभाळणें आणि नवराबायकोनी बऱ्याच गोष्टी एकमेकांच्या स्वभावाशी जमत नसताना जमवून घेणें हे अजिबात वेगळे आहे. नवरा किंवा बायको याशिवायच्या कोणत्याहि नात्याशीं, चुचकारून अगर फटकून किवा अजिबात दूर राहूनहि जमवून घेणे एक वेळ शक्य आहे; पण नवरा किवा बायकोपैकी कोणीतरी एकाने सतत चुचकारून, फटकून किवा दूर राहून जमवून घेणें हे सर्वस्वी अशक्य आहे.

असे सर्वस्वी परस्परांविरुद्ध टोंकाचे स्वभाव, भिन्न टोकांची मने संसार करतांना आपणांस अनेक ठिकाणी दिसतात. पण ते ससार त्या माणसांची मनें आणि स्वभाव खरोखरी करीत नसतात. तर शरीर आणि संस्कारांची दडपणें हे संसार रेटीत नेत असतात. पण माणसांना संसार करण्याची हौस आणि उमेद वाटली पाहिजे; तो रेटीत नेण्याची बळजबरी त्यांच्यावर होतां कामा नये. एवढ्यासाठीच वधूवरांमध्यें स्वभावसादृश्याची अत्यन्त जरूर आहे, आतां तें सादृश्य प्रेमविवाहांतच शक्य आहे असें म्हणतां येत नाहीं तरी अनोळखी वधुवरांना तें समजण्याचा मार्ग अधिक दुर्घट आहे.

अनेक यशस्वी प्रेमविवाहांकडे दुर्लक्ष करून एखाद्या अयशस्वी प्रेमविवाहाकडे बोट दाखवून एखाद्याला विचारतां येते कीं " आतां कां असें झालें ? "

आणि जुन्या पद्धतीने, मोठेपणाचे, लौकिकाचे, बोजे डोक्यावर सांभाळीत सांभाळीत ज्यांची लग्नें झालीं, त्यांच्या लग्नांचेहि बोजवारेच उडालेले दृष्टीस पडतात ते काय म्हणून? ह्या अपयशाची जबाबदारी कोणाच्या शिरावर येते? कोणावर तरी ती असतेच. मग एखाद्याच्या विवाहाचे खापर आप्तेष्टांच्या डोक्यावर फोडण्याची वेळ येण्यापेक्षां जो तो स्वतःच्या लग्नास जबाबदार असणेंच इष्ट नाहीं काय?

प्रीतिविवाहाची कथा 'ऐकणें' हे आमच्या हिंदू मनास मुळींच नवीन नाहीं; परंतु तरुणांचे विवाह हे म्हाताऱ्या मंडळीच्या इच्छेनुरूप होण्याची प्रथा आमच्याकडे पडल्यानें, प्रेमविवाह प्रत्यक्षांत होणें ही गोष्ट मात्र आम्हाला अजून नवीन आहे. शिवाय मुलें व मुली शाळाकॉलेजांतून एकत्र आली तरी तरुणतरुणींनीं एकमेकांशी मोकळेपणानें बोलण्याची पद्धत आमच्याकडे नाहीं; त्यामुळें पंचवीस मुलांतून कोणता पुरुष आपणांस सुखी करूं शकेल, किंवा पंचवीस मुलींतून कोणती मुलगी आपल्या सुखदुःखाची खरी भागीदारीण होऊं शकेल, याचा अंदाज घेण्याची संधि तरुणतरुणींस मिळत नाहीं. त्यामुळें तारुण्यांत आल्यावर स्त्रीला जो पुरुष प्रथम जवळून भेटतो तो तिचा प्रियकर होतो. किंवा पुरुषाला जी तरुणी प्रथम भेटते ती त्याची प्रेयसी होते. असेंहि घडतें.

शिवाय हे सर्व व्यवहार लपून आणि चोरून होत असतात. कारण आपल्या मनांतील विचार वडिल मंडळींस सांगितल्यास आपणास सहानुभूतीचा सल्ला मिळेल याची खात्री तर त्यांना वाटतच नाहीं, पण निश्चित विरोध होईल याचीच खात्री असते. शिवाय तरुण असल्याने ते एकंदरींत गडबडींतच असतात. पण मुलांमुलींच्या पालकांनीं त्यांच्याशीं सहकार्य केले तर पालकांचा सल्ला ते घेणार नाहींत इतकी कांहीं आजची तरुण पिढी बेपर्वा झालेली नाहीं. आपल्या वडिल माणसांचें मार्गदर्शन त्यांना हवे आहे. पण असा सहानुभूतीचा सल्लागार त्यांना मिळत नाहीं, म्हणून परकीं माणसें त्यांना यावेळीं जवळचीं वाटूं लागतात; किंवा त्यांना सुचेल तसे ती वागतात.

पालकांनीं आपलीं मुलें कोणत्या संगतींत असावींत याची काळजी घेतली व त्यांचे त्यांचे जोडीदार शोधून काढण्याची परवानगी त्यांना दिली, तर

पालकांच्या व मुलांच्याहि मनासारखें होणे शक्य आहे. योग्य ते स्वातंत्र्य मोकळेपणा तरुणतरुणींना मिळाला तर अनुरूप वधुवराची निवड होत ज जास्त सुलभ होईल. 'योग्य तें स्वातंत्र्य' हा शब्दप्रयोग मी मुद्दाम वापरला आहे. कारण कांहीं ठिकाणी लग्नाचे बंधन स्वीकारण्यापूर्वी अधिक जवळ येण्याचा धोका तरुणतरुणी पत्करतात व त्यामुळें नैति दृष्ट्या ते अविचार करून बसतात असे दिसतें. पण त्याची कारणे, त्यां दिलेल्या स्वातंत्र्याला मर्यादा नसते आणि दिलेल्या स्वातंत्र्याचा कि उपयोग करावा याची जाणीवहि त्यांना नसते, हींच आहेत. त्याम् तरुणतरुणी आपली नैतिक जबाबदारी विसरण्याचा वेडेपणा करतात. अ तरुण मंडळींना त्यांच्या जबाबदारीची जाणीव त्यांना विश्वासांत घेऊन कर देणें व त्यांच्या स्वातंत्र्याला मर्यादा घालणे ही दोन्ही कामे पालकांचीं आहे व याबाबतींत पालकांचें ऐकून संयमानें रहाणें हें तरुण मंडळींचे प्रथम कर्त आहे.

कोणत्याहि विवाहात एकमेकांची अनुरूपता यालाच महत्त्व आहे. एखाद्या ठिकाणी आपणास असें दिसते की एकजण सुंदर तर एकजण कु असतो. किंवा मुलगा गरीब तर मुलगी चांगल्या श्रीमंतीत वाढलेली अस वरवर पहाणारांना हा फरक विशेष जाणवतो. आणि 'कसे पटत असेल यांचें अशी शंका येते. पण माणसाचे मन ही एक अजब चीज आहे. मानसि साधर्म्य, स्वभावाचा सारखेपणा असला की, सुसंस्कृत मनुष्य स्वरूप आ पैसा या गोष्टींना योग्य ते आणि जरूर तेवढेच महत्त्व देतो आणि एकमेव वरच्या प्रेमानें वरवरचा फरक नाहीसा होऊन ही जोडपी सुखी होतात. उल सौंदर्य आणि संपत्ति असूनहि कित्येक जोडपी स्वभावभिन्नतेमुळे मनानें अल दुरावलेली नि म्हणूनच दुःखी असतात; याचे कारण हेच आहे की, संस राचीं पहिली चारदोन वर्षे सोडली तर, सांसारिक यशापयश हे दोन व्यक्तीच मानसिक साधर्म्यावरच अवलंबून आहे.

पण असे असलें तरी प्रत्येकाचा प्रीतिविवाहच होईल असें नाहीं. अ माणसांनीं आणि प्रीतिविवाह करणारांनीसुद्धां कांहीं गोष्टीचा विचार क आवश्यक आहे. प्रेम म्हणजे नक्की काय हें कोणास एका शब्दांत आणि ए व्याख्येंत सांगतां आलेलें नाहीं. पण असे जरी असलें तरी ह्या प्रेमाची भाव

प्रत्येकाच्या मनात केव्हा ना केव्हा उत्पन्न होते आणि आपले आयुष्य सुखावह, निदान सुसह्य होण्यास या प्रेमाची फारच जरूरी आहे असे प्रत्येकास वाटत असते. याच प्रेमाच्या लाभाने आपल्या आयुष्याचें अनेकांनी नंदनवन करून घेतले आहे तर उलट याच प्रेमाच्या अभावीं कित्येकांचीं आयुष्यें सहारा वाळवंटाप्रमाणें रुक्ष झालेली आहेत. एवढेंच नव्हे तर काहींना या प्रेमाभावीं आपलें आयुष्यच असह्य होऊन त्यांनी जीव दिलेले आहेत. यावरून एवढे निश्चित दिसतें की स्त्रीपुरुषाना एकमेकांच्या सोबतीची जरूरी असली तरी आपले आयुष्य वाटेल त्या स्त्रीच्या स्वाधीन करून किंवा वाटेल त्या पुरुषाच्या जीवनास आपले जीवन अर्पून स्त्रीपुरुष सुखी होत नाहीत; तर स्त्रीपुरुष सहवासांत प्रेमाची जरूरी असते, तशी प्रत्येकाची अपेक्षा असते. आणि म्हणूनच ते प्रेम मिळवून सुखी होण्याचा प्रत्येकास हक्क असणे न्याय्य आहे.

पण हा हक्क बजावितांना, किंवा बजाविण्यापूर्वीच. म्हणजे कोणीहि कोणाच्याहि प्रेमपाशात सर्वस्वी गुंतून जाण्यापूर्वी, एकमेकांशी वचनबद्ध होण्यापूर्वीं, कांही गोष्टींचा विचार तरुणतरुणींनी आपल्या मनाशी अगोदरच करावयास हवा. माणसाचे संबंध आयुष्य हे कोणत्याहि एकाच गोष्टीने कधीच परिपूर्ण होत नसते. किंबहुना कोणत्याहि गोष्टीची पूर्णता म्हणजे अनेक साधनांचें सहाय्य असते. भात हा तांदुळाचाच होतो, गव्हाचा होऊ शकत नाही हें खरें आहे. पण एक साधा भात तयार होणे म्हणजे पाणी, भांडे, विस्तव व तांदुळ एवढी सामुग्री असल्याशिवाय भात होणे अशक्य आहे. आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट अशी की विस्तव, पाणी आणि तांदुळ याचा तारतम्यानें उपयोग करणे हाच सारासार विचार आहे.

विवाह हा प्रेमाशिवाय होऊं नये असे म्हटले तरी आंधळ्या प्रेमाच्या मागे लागण्यात अर्थ नाही, हे प्रत्येकाने ध्यानात ठेविलें पाहिजे. प्रेमविवाह झाला तरी तो डोळसपणाचा आणि विचारांची सावधानता ठेवूनच व्हावयास हवा. कोणत्याहि कृत्याच्या मागे भावनेचा ओलावा नसला म्हणजे तें जसें रुक्ष, कोरडे वाटते, तसेंच कोणत्याहि कृत्याची बैठक वैचारिक आधाराशिवाय असेल तर परिणामी ती अविचारीपणाची ठरते.

माणूस नुसत्या भावनेवर जगत नाहीं आणि नुसत्या विचारांवरहि तरत

नाहीं. सहानुभूतीच्या ओलाव्यानें त्याला जगतां येतें हें खरें आहे. पण विचाराचे प्रवाहच त्याची नौका पुढच्या टप्प्यावर नेत असतात हे विसरून चालणार नाही. माणसाचें मन जिवंत राहाण्यास त्यास भावनेचा ओलावा मिळावा लागतो हें जितकें खरें आहे, तितकेच मानसिक पोषण हें विचारां-वरच अवलंबून असते हेहि खरें आहे. भावना, मग ती कोणतीहि असो, ती केवळ आकस्मिक निर्माण होणे यापेक्षां विचाराच्या आधाराने निर्माण होणे हें अधिक योग्य आहे. केवळ भावनेंतून निर्माण झालेल्या भावनेला अल्पायुषी ठरण्याचा जास्त धोका आहे. पण विचारांच्या आधाराने निर्माण झालेली भावना ही दीर्घायुषी ठरण्याची अधिक खात्री आहे; म्हणून विचारांना अजिबात धुडकावून लावून भावनेच्या आहारी जाण्याचा वेडेपणा कोणीहि करता कामा नये.

विशेषतः लग्नासारखी महत्त्वाची गोष्ट ठरवितांना, प्रेमविवाहातहि डोळस-पणा व विचारांची सावधानता अवश्य असावयास हवी. बहुधा समान स्वभावाची माणसेंच मित्रत्वाच्या नात्याने जवळ येत असतात. तरी पण स्त्री-पुरुषाच्या मैत्रीत नैसर्गिक आकर्षणाचा भर पडत असल्यानें तरुणतरुणींनीं अशा मैत्रीत अधिक डोळसपणा ठेवावयास हवा. त्या दृष्टीनें आपला सामा-जिक दर्जा, आपले वय, आपलें रूप, आपलें शिक्षण, आपले संस्कार, आपली सांपत्तिक परिस्थिति व आपल्या स्वभावांतील गुणदोष इत्यादि गोष्टींचा विचार करूनच आपल्याहि अपेक्षा ठेवावयास हव्यात. कारण कोणत्याहि गोष्टीत अपयश येते तें आपला शहाणपणा जरा कमी पडतो व दूरदृष्टि त्या मानानें कमी काम देते म्हणून! अर्थात् जुन्या किंवा नव्या कोणत्याहि पद्धतीच्या विवाहात सर्वच गोष्टी जमणे नेहमीच शक्य नसते. मग कोणती गोष्ट सोडावयाची व कोणत्या गोष्टीस महत्त्व द्यावयाचे हे ज्याचे त्याने ठरवावे व त्याप्रमाणे वागावे. हे ठरविणे व यशाचें माप पदरात पाडून घेणे हेंच तारतम्य आहे.

हें तारतम्य, भावना आणि विचार यांची योग्य सांगड घालून देण्यावरच अवलंबून आहे. हा समतोलपणा तरुणतरुणींनी ठेवणे जरूर आहे असें आपण म्हणतो; पण हें काम त्यांच्या एकट्याचेच नाहीं. या कामी त्यांच्या पालकांची मदत त्यांना झाली पाहिजे. मुलें व मुली वयांत आल्यानंतर, स्वतःच्या वैवा-

हिक जीवनाबद्दल त्यांनी विचार करूं लागावें, औत्सुक्य दाखवावें, यात अनैसर्गिक किंवा अनैतिक असें कांहींहि नाहीं. परन्तु कित्येक पालकांना आपल्या मुलांनी ही धिटाई दाखवावी याचाच राग येतो. एवढेंच नव्हे तर ते आपल्या वागणुकीत, मुलांना सतत, 'तुम्ही गुन्हेगार आहांत' अशी जाणीव देत असतात. पण हे चूक आहे. राग मानणारांनी आपल्या तरुणपणाची आठवण करून पहावी आणि प्रौढपणातहि स्त्री–पुरुष आकर्षणांतून माणूस सुटू शकत नाही या नैसर्गिक गोष्टीचें विस्मरण होऊं देऊं नये.

हे ध्यानात घेतलें तर आपल्या वैवाहिक आयुष्याबद्दल ज्याचा त्यानें विचार करणें हे बरोबरच आहे. पण वडिलधाऱ्या माणसाच्या धाकानें. असा विचार करणें हे पाप आहे असा समज अनेक तरुणतरुणींच्या मनाचा झालेला असतो. त्यामुळें अशा विचारांना मनांतून घालवून लावण्याचाच प्रयत्न त्यांच्याकडून होत रहातो. पण गंमत अशी होते की, या जबरदस्तीमुळे ज्या विचारांना खरोखरी वैचारिक अधिष्ठान असतें तेच नेमके मनातून बाहेर फेकले जातात आणि जे विचार तारुण्यसुलभ भावनेनेंच निर्माण होत असतात ते नैसर्गिक असल्यानें पापपुण्याच्या धाकदपटशानें कधींहि नाहींसे होत नाहीत. उलट माणसांना बेचैन करून सोडतात: एवढेंच नव्हे तर बंडखोर बनवितात, बंडखोरी शिकवितात. विचारानें केलेले बंड परिणामीं बहुधा यशाचें माप पदरात घालतें. आणि भावनेच्या भरात केलेलें बंड पुष्कळदा अपयशाकडे खेचतें, त्यालाच आपण म्हणतो कीं हें भावनेच्या आहारी जाणें आहे.

लग्न करणाऱ्या सर्वच तरुणतरुणींना वैवाहिक जीवनाबद्दल नीटशी कल्पना पुष्कळ वेळां नसते. आपण विवाह कां करावयाचा, आपलें वैवाहिक आयुष्य कसे असावें, आपल्या परिस्थित्यनुरूप कसे असणे शक्य आहे, वैवाहिक जीवनांतील आपल्या जबाबदाऱ्या व कर्तव्ये कोणती व या दृष्टीनें आपण कार्यक्षम झालों आहोत की नाही, इत्यादि सर्व बाजूंनी सर्वच तरुणतरुणींचा विचार झालेला असतो असे दिसत नाही. आणि वडिलधाऱ्या मंडळींच्या दडपणानें तसा विचार करण्याची त्यांना सवडहि सांपडत नाहीं.

ह्या सर्व गोष्टींचा विचारविनिमय खुल्या दिलानें तरुणतरुणी व त्यांची पालकमंडळी ह्यांच्यामध्ये अवश्य झाला पाहिजे. आपले पालक हे आपणास

केवळ धाकदपटशा दाखविणारे, चुकले कीं चमकावणारे, शासनकर्ते नसून, आपले खरोखरीचे हितकर्ते, आपले प्रेमळ जिवाभावाचे मित्र आहेत असा विश्वास, असा आदर आणि असले प्रेम मुलाना पालकांविषयीं वाटले पाहिजे. असले प्रेम निर्माण करणे हे पालकाचेच काम आहे. त्यासाठी आपल्या मुलाच्या भूमिकेशी समरस होऊन, त्यांच्या म्हणण्याचा विचार करण्याचा समंजसपणा पालकांनी दाखवावयास हवा.

प्रत्येक पुढची पिढी ही मागल्या पिढीपेक्षां नेहमीच दोन पावले पुढे असते, हें त्यांनीं विसरून चालणार नाही. प्रत्येक पिढीचा दृष्टिकोन थोड्या थोड्या फरकाने निराळा होत गेलेला असतो. पिढी पालटतांना सुखाच्या कल्पनाहि त्या दृष्टिकोनाप्रमाणे पालटत असतात हेहि पालकांच्या अनुभवाला आलेलेच असते. असे असताना पालकांनीं आपल्याच मतांचा आग्रह धरून मुलांच्या आयुष्यावर आपल्याच कल्पनांची बळजबरी करतां कामा नये. ज्या गोष्टी मुलांना समजून सांगावयाच्या त्या अवश्य सांगाव्या. कारण अनुभव नसल्यानें तरुणांचे आराखडे बरोबर असतात असें मुळीच नाहीं. ते तसे नसतात याचें कारण तरुणांना अनुभव नसतो हे जसे आहे तसेच वैवाहिक जीवनाबद्दल त्यांना खऱ्याखुऱ्या कल्पना जिव्हाळ्याने कोणी सांगितलेल्या नसतात हेहि आहे. एवढ्यासाठीच मुलांना पालकाच्या सल्ल्याची, पालकांच्या मार्गदर्शनाची जरूरी असते. पण सल्लागार हा जिव्हाळ्याचा मित्र असावा लागतो. हुकूमशहा असून चालत नाही. ही मित्रत्वाची भावना मुलांच्या मनांत उत्पन्न झालेली असेल तर आजची पिढीच काय पण कोणतीहि पिढी आई-बापांचे उद्गार कस्पटासमान लेखण्याइतकी कधीहि मुर्दाड होऊ शकणार नाही.

मुलाच्या वैवाहिक प्रश्नांत आईबापांचा संसार निम्म्या टप्प्यापर्यंत येऊन पोंचलेला असतो. आणि मुलांच्या संसारास म्हणजे आयुष्यासच सुरुवात व्हावयाची असते, ही गोष्ट आईबापानी विसरून चालणार नाही. ‘ आमच्या सुखासाठी, आमच्या लौकिकासाठी तूं या मुलीशी किंवा मुलाशीं लग्न करूं नकोस ’ अशी आपल्या प्रेमाची भीड घालणारे आईबाप आपल्या समाजांत थोडेथोडके नाहीत. आणि ज्या तरुण पिढीच्या नांवाने नेहमी खडे फोडले जातात त्याच तरुणतरुणींनी आपल्या आईबापांच्या सुखासाठी आपल्या प्रेम-

भंगाचें दुःख जन्मभर सोसले आहे अशीहि उदाहरणें कांही थोडीं थोडकीं नाहीत. पण तरुण पिढीचे दुर्दैव कांही ठिकाणी असे दिसते की त्यांच्या या स्वार्थत्यागाची किंमत शून्य मानावयाला त्यांची पालक मंडळी मुळीच कचरत नाहीत. पण मुलांना दुःखी करून, त्यांच्या स्वार्थत्यागाची मातब्बरी दृष्टीआड करून आपल्या लौकिक कल्पनेचे सुख उपभोगीत राहणे हे 'आईवडील' या पवित्र नात्याच्या उच्च प्रेमाला खचित शोभण्याजोगे नाही.

हें सारे ध्यानांत घेऊन, पालकांनी आपल्या मुलांना विश्वासात घेऊन, त्यांच्या वैवाहिक प्रश्नांत मित्रत्वाचा सल्लामसलत देणे अत्यंत जरूर आहे.

असा सल्ला देण्याची वेळ येईपर्यंत मुलगा व मुलगी सांसारिक भार उचलण्याइतकीं कार्यक्षम झालेलीं आहेत कीं नाहीत याचा विचार पालकांनी व स्वतः वधुवरांनी करणे अवश्य आहे. नुसत्या लौकिकाने व संपत्तीने संसार सुखी होऊं शकत नाहींत हे जसे पालकांनी विसरता कामा नये तसेच, नुसत्या प्रेमाने संसाराचे सौख्य उपभोगतां येणार नाही, तर ते प्रेम आणि सौख्य टिकविण्यासाठीं वधुवरांनी अनेक दृष्टींनी कार्यक्षम असणे जरूर आहे, हे तरुण मंडळींनी ध्यानांत ठेवणे अत्यंत अगत्याचे आहे. याचा विचार काही ठिकाणीं होत नाही म्हणून वैवाहिक जीवनांत असंतुष्टता निर्माण झालेली दिसते. म्हणून वधुवरांनी मुख्यतः एकमेकाची वैचारिक पातळी, स्वभावसाधर्म्य, सांपत्तिक परिस्थिति, आरोग्य आणि गुणाबरोबरच स्वरूपाची आवडनिवड यांचा विचार करावा. या सर्वच गोष्टी जमणे शक्य नसेल—आणि पुष्कळदां नसतेहि—तर कोणत्या गुणाचे महत्त्व आपणास अधिक वाटेल याचा आपल्या मनाशी खराखुरा अंदाज घ्यावा, आणि मगच पुढचे पाऊल उचलावे. प्रेमविवाह हा नुसत्याच सौख्याचा निर्माता नाही, जबाबदारी उचलण्याइतका आत्मविश्वासहि वधुवरांत असावा लागतो, याची जाणीव वधुवरांनीं सतत ठेविली पाहिजे.

आपण ठरवीत असलेल्या लग्नाचे अंदाज चुकूं नयेत व खात्री करून घेतां यावी यासाठी एक सूचना मला करावीशी वाटते. लग्नाच्या शपथा घेण्यापूर्वी स्वतःची परीक्षा घेण्यासाठीच तरुणतरुणींनी वर्ष सहा महिने तरी आपल्या नियोजित व्यक्तीचा विरह सहन करावा. आणि केवळ पत्रानेच गांठीभेटी

घेण्याचा परिपाट ठेवावा. एवढ्या अवधीत त्यांचे आकर्षण कायम राहिलें, लग्न करण्याची निश्चितता अधिक दृढ झाली तरच मग लग्नास तयार व्हावें.

याबाबतींत धीटपणा दाखविण्याचें मुलींनी विशेष लक्षांत ठेविलें पाहिजे. कारण कित्येक मुलें आधी प्रेम करून नंतर ऐन विरोधाच्या वेळीं कच खाऊन आपल्या जोडीदारास तोंडघशीं पाडतात व स्वतःहि दुःखी होतात. हा भित्रेपणाच अगदीं घातक आहे. मुलांच्यापेक्षां मुली भित्र्या असतात म्हणून त्यांना मुद्दाम इशारा द्यावासा वाटतो. नाहींतर विरोधाला न जुमानता आपला प्रेमविवाह पार पाडणें याची जबाबदारी मुलीइतकीच मुलावरहि आहेच.

मुलीच्या बाबतींत आणखी एक विशेष सूचना करणें अत्यंत जरूर आहे. स्त्रीपुरुष एकमेकाच्या आकर्षणानें मोहांत पडतात ही गोष्ट खरी असली तरी परिणामाच्या दृष्टीने स्त्री ही पुरुषापेक्षा निसर्गाची अधिक बांधील आहे. आपल्या प्रियकराबद्दल तिला कितीहि विश्वास असला तरी लग्न-बंधनानें एकमेकांचें होईपर्यंत, आपल्यावरील बंधनें विसरण्याचा वेडेपणा तिनें करूं नये. ही जागरूकता दोघांनींहि ठेवणें जरूर आहे. ही जबाबदारी दोघाच्यावरहि वास्तविक सारखीच असावयास हवी. पण परिणाम पुरुषास भोगावे लागत नसल्यानें तो ज्या बेफिकीरीनें वागेल त्या बेफिकीरीच्या बळी पडून स्त्रीनें चालावयाचें नाहीं. पुरुषांवर आरोप करण्याची माझी इच्छा नाहीं, पण पारशी, ख्रिश्चन किंवा युरोपियन मुलींप्रमाणें आमच्या समा-जांतील मुलींच्या वागण्यांत मोकळेपणा असावा असा एक विचारांचा सूर वहात असलेला आमच्या तरुण मुलांमुलींत ऐकूं येत असतो.

पण मुलींनी या वरवर गोंडस दिसणाऱ्या विचारांच्या मोहानें या मन-मोकळ्या वागणुकीला आपल्या मनांत थारा देऊं नये असें मला वाटतें. मुलीच्या भाबड्या वागण्याचा अर्थ सरळच घेण्याइतका आमचा समाज आज तरी निदान समंजस वृत्तीचा आणि सरळ संस्कारांचा नाहीं, ही गोष्ट सर्वांनींच ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. आपल्या भोंवतालचें जग साधे-पणानें आणि सरळपणानें भरलेलें आहे असें अननुभवी लहान वयाला वाटत असतें. पण हीच समजूत कायम ठेवणें म्हणजे भोळेपणानें स्वतःची फसवणूक करून घेण्यासारखें आहे. असल्या भोळसट समजुतीखालीं फस-

लेल्या मुलांमुलींचीं उदाहरणें समाजांत आपणांस दिसत असतात. त्यापासून हाच बोध घेण्यासारखा आहे. असो.

विवाह हा प्रीतिविवाहच व्हावयास पाहिजे, असा माझ्या या सर्व लिहिण्याचा सारांश नाहीं. सर्वांचे प्रीतिविवाहच होतील असें मुळींच नाहीं. पण माहीत नसलेल्या, सर्वस्वी अनोळखी माणसाच्या गळ्यात माळ घालून आंधळेपणानें एकमेकाच्या आयुष्यांत प्रवेश करण्यापूर्वी दहा वेळां विचार करावा आणि हा धोका पत्करूं नये हेंच मला कटाक्षानें सांगावयाचें आहे.

अजिबात अनोळखी किंवा लग्नापूर्वी एकमेकाना प्यार करणारी वधुवरें या दोन्ही पद्धतींत नाहीं म्हटलें तरी धोका आहेच. त्यापेक्षां संपूर्णपणें माहिती असलेल्या, पण प्रेमाच्या आकर्षणांत न सांपडलेल्या वधुवरांची निवड व्हावी हे सर्वांत उत्तम. यांत एकमेकांबद्दलचें जसें अज्ञान नाहीं तसेंच आंधळ्या प्रेमाची कोशीबीरहि नाहीं. या सुवर्णमध्यावर वधुवर व पालक न खटकतां विचारविनिमय अधिक खुल्या दिलानें करूं शकतील.

माझ्या ओळखीची एक बाई फार शहाणी आणि समजस आहे. मुलेसुद्धां तशींच शहाणी आणि विचारी आहेत ही गोष्ट ध्यानात ठेवण्यासारखी आहे. बाईनें आपल्या मुलाना सर्व तऱ्हेचें शिक्षण दिलें आणि त्याचबरोबर विवाह ठरविण्याचें स्वातंत्र्य दिलें. पण मुलाना अगोदरच समजावून सांगितलें कीं " आपल्या जातीच्या कोणत्याहि पोट जातीची मुलगी अगर मुलगा तुम्ही ठरवा. मला चालेल. किंवा माझ्या चालण्यापेक्षां तुमच्या सुखाच्या दृष्टीनें मी तुम्हांला सल्ला देते कीं घरांत मांसाहार करणारा वर किंवा वधु यांची निवड तुम्ही करूं नका. ज्यांचे संस्कार तुमच्यासारखे नाहींत त्यांच्या भानगडींत तुम्ही पडूं नका. गुण आहेत या भ्रमांत प्रकृति व स्वरूप यांची उपेक्षा करूं नका. बापजाद्याचा पैसा असलेल्या वरापेक्षां स्वतः पैसे मिळविणारा मुलगा पसंत करणें बरें; आणि पैशाकडे न पहाता मुलगी ठरविणें बरें. आणि ठरविण्यापूर्वींहि तुम्ही मला सांगा. चोरून भेटूं नका. तुमच्या अडचणी मी ओळखते. तुम्हांला भेटण्याची संधी मीहूनच देईन. "

ह्या बाईचीं मुलें तिच्या सल्ल्याप्रमाणें वागून आतां सुखांत आहेत,

पण वधुवरांनीं आणि पालकांनीं एक गोष्ट ध्यानांत ठेवणें जरूर आहे कीं परस्परांची पसंती ठरविण्याची कसोटी कितीहि कसोशीनें ठरविली तरी ती सर्वस्वी यशस्वी कधीच होणार नाही. आजचे प्रश्न सोडवावेत तों नव्या अडचणी समोर उभ्या राहतात. त्यावर उपाय शोधावेत तों त्याला आणखी नव्याच शाखा फुटत असतात. हें रहाटगाडगें असेंच चालावयाचें. स्त्रीपुरुष आकर्षणांतून जोंवर मानव सुटला नाहीं तोंवर नवे प्रश्न, नवी उत्तरें नवे अनुभव येतच रहावयाचे.

विवाह हा एक सौदा आहे. सौदा हा शब्द भावनाशील मनाला कर्ण-कटु वाटतो. पण तसें न म्हणावे तर काय करावे? कर्तृत्व कर्तृत्व म्हटले तरी मानवाच्या शक्तीला, कल्पनेलामुद्धां अखेर कुठें तरी मर्यादा पडतेच. त्याला कोणी अकर्तृत्व म्हणो कीं नशीब म्हणो! नांव काहींहि दिले तरी लग्नाचा सौदा फायद्यात पडणार कीं महाग पडणार हें माणसाला अगोदर सांगतां येणार नाही. मग ज्याचें त्याचे कर्तृत्व आणि ज्याचें त्याचे नशीब एवढेंच हातीं उरते!

एका मोठ्या पाश्चात्य ग्रंथकारानें आपल्या पत्नीला असे म्हटले आहे की "लग्नाला पंचवीस वर्षे झाल्यानंतर पतिपत्नींना समजते की आपले एकमेकांवर खरेच प्रेम आहे की नाही?"

याचा उघड अर्थ हाच दिसतो की पतिपत्नी प्रेम, मानवी स्वभाव आणि वैवाहिक जीवन या गोष्टीच इतक्या गुतागुंतीच्या आणि गूढ आहेत कीं त्यांची उकल माणसाला पंचवीस वर्षांनंतरमुद्धा होतेच असे नाही.

हे सारें पाहिले म्हणजे वाटते की जुन्या पद्धतीचे अनोळखी विवाह आणि घायकुतेपणानें केलेले प्रेमविवाह या दोन्हींपेक्षा ओळखीच्या वधु-वरांचे "समंजस विवाह" हे अधिक यशस्वी होतील. "वैवाहिक यशस्विता" या शब्दार्थाकडे थोड्या चिकित्सेने पहाणे जरूर आहे. कोणाच्याहि यशस्वी संसारात डोकावून पहा. त्याचे संसार यशस्वी झाले याचा अर्थ त्यांच्यात भांडणाचे, मतभेदाचे प्रसंग कधी आलेच नाहीत असे समजणे वेडेपणाचें आहे. वादविवाद मतभेद हे असावयाचेच. पण ते जिथल्या तिथे सोडून देणें ही सुखी संसाराची गुरुकिल्ली आहे. नव विवाहितांना हे माहीत नसतें.

म्हणून सांसारिक जीवनांत शंभर टक्के यश ते अपेक्षितात. पण या जगांत एका सारखा दुसऱ्याचा स्वभाव, साच्यांतून काढल्या सारखा कधीच भेटावयाचा नाही. तेव्हां वधुवरांनीं एकमेकांना सर्वस्वी संवादी असण्याची शक्यता शंभर टक्के अपेक्षिणें, ही अपेक्षाच मुळांत चूक आहे. पन्नास टक्क्यांच्यावर आपलें वैवाहिक जीवन सुखाचे जाईल असा ज्यांना विश्वास असेल त्यानी आपल्याला शंभर टक्के यश मिळणार आहे असेच समाधान मानण्याचे मनाला शिकविले पाहिजे. कारण वैवाहिक जीवनात शंभर टक्के यश ही कवि कल्पना आहे. पण सत्य याहून बरेच निराळे आहे. या सत्याची जाणीव वधुवरांनी करून घेतली पाहिजे. अपेक्षा बेतानें ठेवाव्या, म्हणजे दुःख करण्याची पाळी कमी येते. हा वेदांत नाही म्हटले तरी माणसाला संसारात अंगिकारावाच लागतो. त्याचीच ही सुरुवात असें समजावें. सांसारिक जीवन हे असे आहे की सुखाची सावली आणि दुःखाचे ऊन, दोन्ही असावयाचेंच. जबाबदारी पतकरल्याशिवाय सुख कधी हाती लागावयाचें नाही. तेव्हा लग्नाला उभे राहण्यापूर्वी हजार वेळां विचार करावा. पण जेव्हां एकमेकाच्या गळ्यांत माळ घालावयाची त्यावेळी वधुवराचा दृढ निश्चय हवा कीं माझ्या जोडीदाराला मी जास्तीत जास्त सुखी करण्याचा प्रयत्न करीन. माडलेला हा संसार मी आनदाने तडीस नेईन. ' हे असेच आहे, ते तसेंच आहे ' अशा तक्रारी होता होईल तो करणार नाही; आणि शक्य तो तडजोडीनें वागून समाधानी राहीन.

अशा वृत्तीनें वागणारांचे संसार सर्व साधारणपणे, वधुवरांत कोणत्याहि प्रकारची विषमता नसेल तर, सुखाचे होतात. नाही तर सर्व यथास्थित असून केवळ जिकीरखोर स्वभावामुळे संसारांत असमाधान माजते.

सॉक्रेटिसला एकानें विचारले ' लग्न करण्यात सुख आहे कीं लग्न न करण्यांत सुख आहे ? '

त्यानें उत्तर दिले ' लग्न केलेस तरी तूं पस्तावशील. नाहीं केलेंस तरीहि तूं पस्तावशील. '

याचा अर्थ काय ? याचा अर्थ सूज्ञांस सागणें नलगे.

आता वैवाहिक प्रश्न केवळ प्रेमविवाहावरच थांबलेला नाही. घटस्फोटा-बाबतचीं बिलें पास होऊं लागली आहेत. आणि घटस्फोट घेण्याचा प्रसंग न यावा असेंच नव्या किंवा जुन्या कोणत्याहि पिढीला वाटत असते, तेव्हां वधुवरांनीं आपली वैवाहिक जबाबदारी उचलावी व पालकांनी त्यांना योग्य तो सल्ला व जरूर ते सहकार्य द्यावें, हेंच उभयपक्षीं समंजसपणाचे आहे.

विवाह हा विषय एकट्या स्त्रीचा होऊं शकत नाही, म्हणून या विषयावर मीं माझे सर्व विचार तरुण तरुणींचा अंतर्भाव करून मांडले आहेत. तरी पण लग्न करणाऱ्या मुलीच्याहि आपल्या वराबद्दल कांहीं अपेक्षा असतात; आणि त्यासंबंधीच मी पुढील लेखांत लिहिणार आहे.



# आजच्या मुलींच्या अपेक्षा : : ९

मागील दोन्ही लेखांत आमच्याकडील विवाहासंबंधी तरुणींच्या बरोबरच तरुणांचाहि अंतर्भाव करून मी माझे बरेचसे विचार सांगितले. मुलीचें लग्न म्हणजे मुलाचेंहि लग्नच असल्यानें तरुण व तरुणी या दोघांच्याहि दृष्टीनें हा विषय मी लिहिला. पण एवढेंच लिहून भागण्यासारखें नाहीं. यांत मुलींच्या बाजूनेंहि सांगण्यासारखें कांहीं शिल्लक आहेच.

आणि तें म्हणजे हेंच कीं विवाहांत स्त्रीपुरुषांचा सारखाच भाग असला तरी पुरुषाच्या विवाहाकडे आणि स्त्रीच्या विवाहाकडे पहाण्याचा आमचा दृष्टिकोन फार निराळा आहे. पुरुष छत्तीस गुण जमणारी बायको शोधीत असतो. आपल्या भावी वधुसंबंधीं तो आपल्या स्वतःच्या लायकी-च्या मानानें जास्त अपेक्षा ठेवूं शकतो. आणि त्या पुष्कळदां त्याला कमी कमी करीत आणाव्या लागल्या तरी, अनेकदां त्या सफल होतातहि. पण मुलीचें मात्र असें होत नाहीं. अगदीं कितीहि सुधारणा झाली म्हटली तरी मुलीच्या आपल्या वरासंबंधीं काय अपेक्षा आहेत हें बहुधा कोणी विचारीत नाहींत. विचारीत नाहींत याचें कारण हेंच आहे की मुलाप्रमाणेंच मुली-च्याहि अपेक्षा असणें शक्य आहे, स्वाभाविक आहे, हें मानसशास्त्र आम्हां-ला माहीत नाहीं; कोणी समजावून घेतलेलें नाहीं. " किती झालं तरी तो मुलगा आहे. आणि कांहीं झालं तरी ती मुलगी आहे. " हा जो महामंत्र कोणत्या तरी काळीं कोणीतरी एकानें उच्चारला तो कानमंत्र दिल्यासारखा अद्याप चालूंच आहे.

स्त्रीपुरुषांत जे नैसर्गिक फरक आहेत ते आहेतच. ते मान्य करावयाला लाज वाटण्याचें कारण नाहीं. पण लग्नाच्या वेळीं नवऱ्याला बायको आवड-ली पाहिजे ही जशी काळजी घेतली जाते, तशी बायकोलाहि नवरा आवड-ण्यासारखा असला पाहिजे अशी फिकीर मात्र पुष्कळ ठिकाणीं केली जात

नाहीं. पुरुषाला बायको जशी त्याच्या तोलाची, त्याला शोभेशीं, त्याच्या अपेक्षेप्रमाणे हवी, तरच त्याचा संसार सुखाचा होणार, हें जसें खरें, तसेंच मुलीलाहि नवरा तिच्या पसंतीचा, तिला शोभेसा आणि तिचें मन आकर्षित करून घेणारा हवा, हेंहि खरें आहे. पूर्वीपेक्षां मुली आतां वयानें, शिक्षणानें मोठ्या झालेल्या असतात. " ह्यांच्याशी माझे लग्न व्हावयाचें आहे" असें इतरांना सांगण्यांत तिला आनंद, अभिमान वाटावयास हवा, तरच तिचा संसार सुखाचा होणार.

कोणी म्हणतील कीं पूर्वीच्या बायकांनीं नाहीं का संसार केले? त्यांना कुठें होत्या अपेक्षा? त्यांचे नाही कोठें बेबनाव झाले?

खरें आहे हे म्हणणे. पण तेसुद्धा अर्धसत्यच आहे. पूर्वीच्या स्त्रियाना अपेक्षा नव्हत्या ही गोष्ट बरीचशी खरी आहे. पण कित्येकींना अपेक्षा होत्या हीहि पुष्कळशी खरीच गोष्ट आहे. ज्यांना अपेक्षा नव्हत्या त्याना शिक्षणाचा गंध नव्हता. घरांतील कामकाज, मुलांचे संगोपन, पतीची सेवाचाकरी आणि त्याला देवासारखा मानून पण कडक दैवतासारखे भिऊन वागणे, हाच आपला धर्म, हेंच आपल्या आयुष्याचे पैलतीर, अशी त्यांची श्रद्धा होती. ह्याच श्रद्धेचे संस्कार त्याच्या मनावर बुध्याच केले जात होते. त्यामुळे त्यांच्या मनांत अपेक्षा उद्भवणेंच कठीण होतें. आणि ज्या अपेक्षा मनुष्यस्वभावानुरूप उत्पन्न होत त्या रूढींत बसत नसल्यानें त्यांच्या त्याच दडपून टाकीत असत. अपेक्षा करणे हे पाप हीच जिथे श्रद्धा तिथें अपेक्षाभंग होण्याचा संभव कसा असणार?

पण पूर्वी, ज्या काळात अशा श्रद्धाळु स्त्रिया होत्या त्याच काळांत स्वतःच्या अपेक्षा ठेवणाऱ्याहि स्त्रिया होत्याच. धैर्याच्या अभावीं किंवा शिक्षणाच्या अभावीं त्यांनी त्या बोलून दाखविल्या नसाव्यात. पण ज्या माणसांना उपजतबुद्धि असते, त्यांच्यावर शिक्षणाचे संस्कार घडले नाहींत तरी त्यांनाहि स्वतःचे विचार असतात; आणि ज्यांना विचार असतात त्यांना अपेक्षाहि असतातच. मग तो काळ जुना अगर नवा कोणताहि असो.

पूर्वीच्या काळींहि अशा कित्येक विचारी स्त्रियांची अपेक्षाभंगानें फार कुचंबणा झालेली आहे. पतीचीं दुरुत्तरें ऐकून मूग गिळून गप्प बसणाऱ्या

स्त्रिया पूर्वी होत्या, तशाच अपमानाच्या टोचणीने सतत जळत रहाणाऱ्या स्त्रियाहि होत्याच. ज्या काळांत सिधूचें चित्र गडकऱ्यानीं रंगविलें त्याच काळांत गीतेचेंहि चित्र त्यांनीच रंगविले आहे. सिंधूची असामान्य सहनशक्ति दाखविणाऱ्या स्त्रिया पूर्वी अनेक आढळत असत तरी अपेक्षाभंगानें दुःखी- कष्टी झालेल्या स्त्रिया " या माणसाच्या पदरीं मी पडलें नसते तर पवित्र झालें नसते का ? " असे उद्गार आपल्या मनाशीं काढून तळमळत नव्हत्या असें थोडेंच आहे ?

म्हाताऱ्या नवऱ्याच्या गळ्यांत बांधलेली तरणी बायको ही सुखानें आणि मनापासून संसार करीत असते असें मानणें ही निव्वळ फसवणूक आहे. व्यसनी नवऱ्याची बायको, सतत आजारी माणसाची पत्नि, तिरसट, पिसाट माणसाची बायको सुखाने नांदत असते असें समजावयाचें काय ? तरी पण त्यांचे संसार झालेच. आणि त्याचे कारण एकच की बायकांची जात म्हणजे मन नसलेला जीव, आत्मा नसलेला प्राणी. स्त्रीचा जन्म म्हणजे पापांची परंपरा, असले जे सस्कार स्त्रियांच्या मनाशी निगडीत झाले होते, त्यामुळें पुढें आलेला घास त्यांनी निमुटपणे गिळला. नापसंतीचा उद्गार काढला तो स्वतःच्या मनाशी. अपेक्षाभंगाचे अश्रु गाळले ते एकांतांत. ते उद्गार कोणाला ऐकूं गेले नाहीत, ते अश्रु कोणाला दिसले नाहींत, म्हणजे त्याचें अस्तित्वच नव्हतें असें मानणें हे स्त्रीच्या मनाशीं समरस न होण्यासारखें आहे.

आजसुद्धा कित्येक तरुणी सर्वस्वी विरुद्ध टोकांच्या पतींशी संसार करीत आहेत. त्यांची उदाहरणें किती म्हणून सांगावीं ! माझी एक मैत्रीण लहानपणापासून फार चांगली गात असे. तिची माझी एका मंगळागौरीच्या समारंभाला गाठ पडली. तेव्हां तिच्या गोड आवाजाची आठवण होऊन मी तिला गाण्याचा आग्रह करूं लागले. म्हण म्हटल्याबरोबर गाणें म्हणणारी मुलगी, पण फार आढेवेढे घेऊं लागली. तेव्हा मी तिची थट्टेनें जरा कानउघाडणी करूं लागले, तर गाण्याऐवजी ती हुंदकेच देऊं लागली ! लग्न झाल्यापासून गेलीं चार वर्षे तिच्या नवऱ्यानें तिला गाणें म्हणण्याची बंदी केली होती. कारण बायकांनीं गायलेलें त्याला आवडत नाहीं. गायनावर एवढा कटाक्ष होता तर त्यानें शास्त्रोक्त गायन शिकलेली मुलगी केली कशाला ? तिच्या

गाण्याची एवढी मुस्कटदाबी होईल अशी मुलीकडील मंडळींना मुळींच कल्पना नव्हती. "घरांत अगदी गुणगुणायचेंसुद्धां नाहीं" हा घरांतील माणसांचा नि विशेषतः पतिराजांचा हुकूम पाळतांना या मुलीला काय आनंदाच्या उकळ्या फुटत असतील? ज्यांना गायनाचा आनंद उपभोगण्याचें समजते त्यानां या अरेरावीची खरी कल्पना येईल. हाच अरेरावी स्वभाव त्याचा प्रत्येक बाबतींत आहे.

माझी दुसरी एक मैत्रीण आहे, शिकलेली नाहीं, पण हुशार आहे. लग्न झालें तेव्हां नवरा श्रीमंत होता. पण कांहीं काम न करतां बापाचा पैसा हवा तसा उधळून टाकला. आता अशी स्थिति झाली आहे की, काम केल्याशिवाय हातातोंडाची गांठ पडणे मुष्कील झाले आहे. नवरा तर काम करीत नाहीं. शंभर रुपयांची कारकुनी त्याला आवडत नाही. पांचशें रुपये मिळविण्याची अक्कल नाही. आणि बायको बाहुल्यांच्या कारखान्यांत जाऊन काम करीन म्हणते, तर तिला जाऊ देत नाही! कारण ह्याच्या बायकोनें पैसे मिळवावयाचे म्हणजे त्याची अब्रु जाते! मग प्रपंच चालावा कसा? हा खुशाल घरांत निजून रहातो. आणि ती पुढे कसें होणार याचा विचार करीत बसून रहाते. असल्या बेजबाबदार नवऱ्याचें आकर्षण वाटणें, खरेंच कसें शक्य आहे? तिला पैसे मिळविण्याचें स्वातंत्र्य दिलें तर संसाराची दुर्दशा तरी टळेल, एवढी ती हुशार आहे. पण तिची अशा मूर्ख माणसाशीं गांठ पडली ह्याबद्दल तिच्या मनाला किती यातना होत असतील? न्यूनगंड उत्पन्न होण्याची परिस्थिति नवऱ्याची असतांना, केवळ तो नवरा म्हणून हिच्यावर अरेरावी गाजवितो. आणि बायकोजवळ कर्तृत्व असूनहि परंपरागत चालत आलेला न्यूनगंडाचा वारसा तिला पत्करावा लागतो!

आमच्या शेजारी एक जोडपें रहातें. त्यांना एकच मुलगा आहे. पण या मुलापायीं त्यांची किती आदळआपट व्हावी! बायको खरोखर अगदीं गरीब आणि शात स्वभावाची आहे. पण नवरा म्हणजे जमदग्नीचा अवतार. मूल रडूं लागले कीं, याच्या तोंडाचा पट्टा सुरू होतो. शिव्यांची मुक्तकंठानें उधळपट्टी होते आणि अखेर घरांतील विळी उचलून तो त्या पोराला नाहीं तर बायकोलाच मारावयाला उठतो! त्यावेळीं तो एवढ्या कर्कश स्वरांत आणि जीव खाऊन ओरडतो की, आम्हीं शेजारपाजारची मंडळीसुद्धां दटावलेल्या

पोरांसारखी गप्प बसतो. मला वाटते, बापाचा हा आरडाओरडा सतत ऐकून ऐकून तो मुलगा मोठा होईल तेव्हां बहिरा झालेला असेल ! कोण हा आक्रस्ताळा स्वभाव ! अशा माणसापुढे शांत माणसाने काय समाधि लावून बसावयाचे ? दिवसभर चाललेल्या त्याच्या या आरड्याओरड्याने बायकोचा जीव अगदी दमून जातो. तिच्या शांत स्वभावाची केवढी क्रूर थट्टा आहे ही !

अशीं किती उदाहरणें सांगावीं ? पूर्वींच्या मुलींनी या साऱ्या गोष्टी सहन केल्या असल्या तरी आजच्या मुली इतक्या आंधळेपणाने माळ घालून कोणाचा तरी जन्माचा जुलूम सहन करायला तयार नाहीत. सर्वसाधारण सुशिक्षित पांढरपेशा मुलीच्या मनांत स्वतःच्या वराबद्दल कांहीं अपेक्षा उत्पन्न झालेल्या आहेत. नवरा हा देव आहे, दैवत आहे ह्या कल्पना मानावयास आजच्या मुली तयार नाहीत. पति हा जीवाभावाचा सोबती, जन्माचा सहचर, जिवलग मित्र असावा, अशी त्यांची अपेक्षा आहे. अशा अपेक्षा करणाऱ्या मुली पतीची सेवा करणार नाहीत, त्याच्याशी मी तूं करीत केवळ वाद घालीत बसतील, त्याला केर काढण्यास लावतील, असे समजण्याचे मुळींच कारण नाही. बी. ए. झालेली मुलगी आपला पति बाहेर जावयास निघाला असतां त्याचे बूटसुद्धां चटदिशी त्याचेसमोर ठेवण्यांत मुळीच कमीपणा मानीत नाही हे मी प्रत्यक्ष पाहिलेलें आहे.

स्त्रिया शिकल्या कीं शेफारून जातात, त्यांनीं अपेक्षा ठेवल्या कीं त्या बेजबाबदार होतात, त्या मनमिळाऊपणानें वागत नाहीत; तडजोडीची वृत्ति त्यांच्यात नसतेच, नम्रता, शालीनता या गुणांची मातब्बरी त्यांना वाटत नाहीं, हे नव्वद टक्के पुराणमतवादी लोकांनी सुशिक्षित स्त्रियांवर केलेले पूर्वग्रहदूषित निव्वळ आरोप आहेत. अशा बेजबाबदार स्त्रिया कोणी असतील तर त्यांना सुशिक्षित म्हणतांच येणार नाहीं.

शिक्षणाने, अपेक्षा ठेवण्यानें स्त्रिया बेजबाबदार होत असत्या तर कै. आगरकर, महर्षि कर्वे यांच्यासारख्या स्त्रीस्वातंत्र्याचा पुरस्कार करणाऱ्या विचारवंतांनी आपलें आयुष्य स्त्रीदास्यविमोचनार्थ खर्ची घातले नसते. पुरुषवर्ग आजपर्यंत शिकत आला तेव्हां त्यांच्या शिक्षणानें ते बेजबाबदार झाले असे कां नाही कधी कोणास वाटलें ? खरी गोष्ट अशी आहे कीं

शिक्षणानें वृत्ति निर्भय होते, आत्मविश्वास वाढतो, जबाबदारी उचलण्याची पात्रता अधिक येते हे सर्वांना माहीत आहे. परंतु हे सर्व सद्गुण पुरुषांना जसे शोभून दिसतात तसे स्त्रियांना दिसत नाहींत असे आम्हास वाटते. कारण असेच संस्कार आमच्यावर झालेले आहेत. पण स्त्री निर्भय असणें, तिचा आत्मविश्वास वाढणे, जबाबदारी उचलण्यास अधिक समर्थ होणें यात वाईट काय आहे? तीहि आता कार्यक्षम होत आहे तेव्हां तिच्या विचारांचा विचार करणे जरूर आहे ही गोष्ट समाजाने आता ध्यानांत घेतली पाहिजे. मग शिकलेल्या मुलीला किंवा स्वतःच्या लग्नासंबंधी कांहीं अपेक्षा ठेवणाऱ्या मुलीला विनाकारण नावे ठेविण्याचे किंवा बिचकून जाण्याचें मुळीच कारण नाही.

पूर्वीच्या स्त्रियांना आपल्या पतीचे सारे काही आपण करावे असें वाटत असे तसेंच आतांच्याहि मुलींना वाटत असतेच. ज्यांना वाटत नसेल, आळस असेल त्याची ती चूक आहे असे म्हणावे लागेल. स्त्रीने पुरुषाची सेवा करणें हा एक शृंगाराचाच प्रकार आहे. यांत कमीपणा मुळीच नाहीं. ते जिव्हाळ्याचे प्रेम आहे. हा जिव्हाळा, हे प्रेम आणि हा शृंगार, कोणत्याहि काळात, कोणत्याहि लग्नाच्या पद्धतीत स्त्रीपुरुषांना सोडून जाणे अशक्यच आहे. आज फरक एवढाच झाला आहे की, पूर्वीची स्त्री पतीला वाढून मग आपण जेवते आणि आजची स्त्री आपल्या पतीबरोबरच जेवावयास बसण्याची इच्छा करते. अर्थात् शक्य असेल तर! पूर्वी पतीला कांही आजार झाला तर पत्नी सेवासुश्रुषा करी. पण ती स्वतःच आजारी पडली तर पतीनें आपलें कांही करावे ही कल्पना फार करून तिच्या मनातच येत नसे. आजची पत्नी पतीची सेवा करील आणि त्याच्याकडूनहि आपले कौतुक करून घेण्यांत संकोच मानणार नाहीं. आजची मुलगी नवऱ्याचा मान जरूर राखील. पतीचा मोठेपणा तो आपलाहि गौरवच आहे हें समजण्याइतकी ती शहाणी खास आहे. पण आपला मोठेपणा तो पतीला उणेपणा वाटतां कामा नये, त्यानेहि त्यांत आनंद मानाला पाहिजे अशी अपेक्षा ती करणारच.

आपल्याला संतति किती असावी हा प्रश्न दोघांचाहि आहे; आणि त्यांतल्या त्यांत स्त्रीच्या अधिक जिव्हाळ्याचा आहे. पण आजपर्यंत तो पुरुषाच्या मनावरच जास्त अवलंबून राहिलेला दिसतो. आजच्या मुलीला

हा प्रश्न पतीच्या सल्ल्यानें, पण स्वतःला समाधानकारक, सोडविला जाण्याची इच्छा आहे. पतीच्या कलाने वागण्याचें धोरण आजच्या मुलीनेंहि ठेविलेंच पाहिजे. पण आपलेंहि मन मोडण्याची बेफिकीरी त्याने दाखवूं नये, असें तिला वाटत असतें. पतिपत्नींनी उभा केलेला संसार हा दोघांच्याहि विचार-विनियमानें सुशोभित व्हावा अशी आजच्या मुलीची मागणी आहे. ' मी म्हणेन तीच गोष्ट या घरांत झाली पाहिजे, मी म्हणतो म्हणून असं कर ' अशा तऱ्हेच्या एकतर्फी संसारात आजची मुलगी सुखी होणार नाही.

ती आपल्या पतीची जिवापाड काळजी घेईल, पण आपला प्रियकर आपल्या जीवालाहि जपत असतो ही अंतर्मनाची साक्ष तिला प्रत्यक्षांत मिळायला हवी आहे. ज्याच्या सहवासासाठी आपण व्याकूळ होतों तो आपल्या जीवाचा आधार आहे ही खूण तिला पटावयाला पाहिजे. ज्याच्याबरोबर आपण जन्माचा प्रवास करायला निघालों त्याच्या हातांत हात घालून चालण्याचें सौख्य उपभोगायला मिळणे हे ती आपले भाग्य समजते आहे. पतीच्या मागून रेंगाळत, न्यूनगंडाचें ओझें पाठीवर घेऊन येण्यात आजच्या मुलीला सौख्य वाटणार नाही. ज्या संसाराचे कष्ट ती पतीच्या बरोबरीनें उपसणार, ज्या पुरुषाची अर्धांगी म्हणून ती मिरवणार आणि ज्या घराकडे बघून ती ' हे माझे घर आहे, आमचे घर आहे, आमच्या दोघाचा हा संसार आहे ' असे अभिमानाने आणि जिव्हाळ्याने म्हणणार, त्या घरांत दोन चार रुपयेसुद्धां खर्च करतां न येण्याचें आर्थिक पारतंत्र्य तिला रुचण्या-सारखें नाही.

सारांश, तिला तिच्या संसारांतील स्थान आपल्या जोडीदाराच्या शेजार-चें हवें आहे. समान भूमिकेवरून वावरण्याची इच्छा करणें म्हणजे सदो-दित भांडणाची तयारी करणें असा याचा अर्थ नाही. समंजस मुली कांहीं असा अर्थ लावणार नाहींत. आजच्या मुली आपल्या पतीकडून प्रेमळ वाग-णुकीचीच अपेक्षा करीत असतात. ही वागणूक मिळावी यासाठीं नवऱ्याची सांपत्तिक परिस्थिति बेताची असली तरी त्यांत त्या संतोष मानावयाला तयार आहेत. आजच्या विचारी सुशिक्षित मुलींना संसारास जरूर त्या पैशाची मातब्बरी समजते. एवढेंच नव्हे तर शक्य तर स्वतः या गोष्टीस हातभर लावण्याची त्यांची तयारी असते. मात्र स्वभावानें,

बुद्धीनें तो आपल्या मानानें आपणांस मिळावा हीच त्यांची खरी अपेक्षा आहे. स्वरूप आणि पैसा यांचा योग्य तो विचार करून स्वभाव आणि बौद्धिक पातळी या गोष्टींना आजच्या मुलीं अधिक महत्त्व देतात, आणि हे चूक आहे असें कोणता विचारी माणसें म्हणतील ?

मात्र, मुलींनी स्वतःच्या पसंतीने लग्न करणे, अपेक्षा ठेवणें हे बरोबर आहे, असें म्हणतांना मुलींनी एक गोष्ट ध्यानांत ठेवावयास हवी. वरपसंती करण्याची, अपेक्षा ठेवण्याची वैचारिक पात्रता आपल्यांत आणण्याचा प्रयत्न त्यांनी केला पाहिजे. नाही तर स्वातंत्र्य पाहिजे या नांवाखाली मूर्ख मुलीहि भलत्याच माणसाशी लग्न ठरवून आपल्या पालकाना पेचांत टाकतात व स्वतःहि फसतात. असें होता कामा नये. त्याचप्रमाणें सुबुद्ध मुलींना दुराग्रहानें मूर्ख ठरवून त्यांना विरोध करण्याचे धोरण पालक मंडळींनीहि सोडून दिलें पाहिजे.

असो. पुरुषांनी दुसरीं लग्ने केलीं तेव्हां बौद्धिक पातळीचा अभाव हे प्रथम पत्नी न आवडण्याचे एक कारण दाखविले गेले. आणखीहि कांहीं कारणानीं पुरुषांनीं आपल्या बायका टाकल्याची अनेक उदाहरणे आहेत. आपल्या ह्या उणीवा स्त्रियानी भरून काढणें जरूर आहे. ज्या अपेक्षा मुलींच्या असतात त्यापेक्षा कितीतरी जास्त अपेक्षा पुरुषांनी आज कित्येक वर्षे आपल्या उराशीं कवटाळून धरलेल्या आहेत. पुरुषालाहि त्याची बायको त्याला आवडेल अशी, पुरुषांच्या भाषेत म्हणजे 'स्मार्ट' आणि बायकांच्या शब्दांत म्हणजे 'चुणचुणीत' मिळायला हवी असते, हें खरें आहे. तशा 'स्मार्ट' होण्याचा प्रयत्न मुलींनी करणे जरूर आहे हे त्यांनी विसरून चालणार नाही. संसार सुखी होण्याला स्त्रीपुरुषांत शारीरिक आणि मानसिक आकर्षण नेहमींच कायम असावें लागते, याची जाणीव उभयतांनी सतत ठेविली पाहिजे. लग्न झाल्यानंतर, 'आतां कुठं जायचे आहे दाखवायला ?' असें म्हणून मुलींनी उदास वृत्तीनें वागतां कामा नये. आपले विचार, आपला पोशाख, आपली राहणी याविषयीं अव्यवस्थित राहून चालणार नाहीं. कारण लग्न झाल्यानंतरच याची खरीखुरी जरूरी असते. आपल्या पतीचें मन आपणच एकटीनें अंकित केलेलें असावें अशी दक्षता कोणत्याहि प्रेमळ पत्नीनें घेतलीच पाहिजे.

पण हा उपदेश स्त्रियांना नव्यानें करण्याची गरज नाही. तो उपदेश प्रा. प्र. के. अत्रे यांनी ‘ लग्नाच्या बेडी ’त केलेला आहे आणि सौ. मालतीबाई दांडेकर याच्या ‘ आकर्षक संसारा ’ नेहि केलेला आहे. मला फक्त एवढेंच सुचवावेसें वाटते की, आजपर्यंत पत्नी गबाळी किंवा बौद्धिक तोलाची नाहीं म्हणून पतीच्या मनांतून ती उतरत असे. तोच प्रकार उद्यां उलट पायरीनें होणारच नाही असे समजून मात्र कोणी गैरसावध राहू नये. निर्बुद्ध पतीच्या तोंडचे शब्द झेलून दिवस काढणाऱ्या पतिव्रतांचा जमाना आता संपत आला आहे. जी बौद्धिक पातळी आणि जो व्यवस्थितपणा पुरुषानें स्त्रीकडून अपेक्षिला त्याच अपेक्षा आजच्या उद्यांच्या मुलींच्याहि आपल्या पतीसंबंधीं आहेत. तेव्हां पुरुषांनींसुद्धा आपली बौद्धिक पातळी आणि आपला व्यवस्थितपणा याची हयगय करून चालणार नाही.



# शिक्षित गृहिणीबद्दलच्या अपेक्षा आणि आक्षेप : : ६

मागील लेखांत वैवाहिक जीवनाबद्दलच्या मुलींच्या अपेक्षा मी सांगितल्या. स्त्रीचें वैवाहिक जविन सुखाचे व्हावे आणि तिच्या विचाराना महत्त्व देण्याचें, तिच्या भावना ओळखण्याचे अगत्य दाखविलें जावें, हाच माझा मुख्य हेतु, "मुलींच्या अपेक्षा" लिहिण्यांत होता. संसार सुखाचा होणें ही गोष्ट पति आणि पत्नी या दोघांच्याहि जबाबदारीची आहे. परंतु वैवाहिक जीवनाबद्दल असें कांही नेमकें अनुमान काढता येत नाही, एखादा खात्रीचा उपाय सुचवितां येत नाही, किवा निश्चित सिद्धान्त बसवितां येत नाही, की अमुक अमुक गोष्टीची काळजी घेतल्यानतर वैवाहिक जीवन सर्व दृष्टींनी समृद्ध होईल. सर्व तऱ्हेची काळजी घेऊनहि, चांगल्याच गोष्टी योजूनहि, परिणामी काहीं विपरीतच घडते, असा अनेक विचारी व अनुभवी लोकाचा अखेरचा निर्णय आहे. नाही तरी जगांत अशी कोणतीहि संस्था नसेल की, जिच्यात नित्य नव्या सुधारणांची भर घालावी लागत नाही, नव्या दृष्टिकोनांतून विचार करावा लागत नाही. मानवी जीवनाची मूल्ये 'दोन आणि दोन चार' अशा गणिती सिद्धान्तावर अवलंबून नसल्यामुळे आज केलेली सुधारणा उद्या जुनी ठरण्याचा काळ केव्हां तरी येतोच.

जी सुधारणा नव्यानें करावी ती काही काळ तरी समाजव्यवस्थेस पोषक अशी होते. पण काळ पुढें जात असतो, आणि परिस्थिति रोज नव्या रूपांत पालटून माणसापुढे उभी राहात असते. सामाजिक, राजकीय, आर्थिक, इत्यादि बाबी माणसापुढें रोज नवीं प्रश्नचिन्हें टाकून त्याच्या बुद्धीचा कस पहात असतात; आणि माणसांना या प्रश्नचिन्हाचा निकाल लावण्याची पराकाष्ठा करावी लागते. कारण माणसांना आपले जीवन मानवी स्वभावाच्या

अभ्यासावर अवलंबून ठेवावें लागतें. आणि माणसाचे मन हें इतक्या उलट-सुलट गति घेत असतें की त्यानेंच केलेल्या सुधारणा त्यालाच जुन्या वाटूं लागतात, किंवा ज्या जुन्या व त्याज्य म्हणून त्यानें मागें सारलेल्या असतात त्याच त्याला पुन्हां अंगिकाराव्या लागतात. या गोष्टींना कांही उपाय नाही असे म्हटले तरी आपणच ठरविलेल्या गोष्टी आपणांसच अमान्य होण्याची वेळ निदान फार लौकर तरी येऊं नये एवढी काळजी घेणे अत्यंत जरूर आहे. म्हणून आपल्या वैवाहिक जीवनाविषयी विशिष्ट अपेक्षा ठेवणाऱ्या मुलींच्याबद्दल लोकांच्या अपेक्षा काय असतात आणि अलिकडील मुलींवर जुन्या मंडळींनी घेतलेले आक्षेप काय आहेत, याचा विचार प्रांजलपणें व्हावयास पाहिजे असे मला वाटते, व त्याचाच विचार आजच्या लेखात करण्याचा माझा मानस आहे.

तीस चाळीस वर्षांपूर्वी स्त्रीशिक्षणाचे महत्त्व कोणास वाटत नव्हतें. पण सध्यांच्या काळात शहरांतील मुली तरी बऱ्याच प्रमाणांत मुलांच्या बरोबरीचें उच्च शिक्षण घेऊं लागल्या आहेत. खेड्यातून मात्र पांढरपेशा वर्गातील किती तरी मुली नांवाला साक्षर झालेल्या असतात. मग मागासलेल्या जातींत साक्षरतेचें प्रमाण किती अल्प असेल याची सहज कल्पना करता येईल. पण ज्या काळांत स्त्रीशिक्षण फारसें नव्हतें त्या काळांत स्त्रीपुरुषाचे संसार सुखानें होत असत, व आता स्त्रीशिक्षण वाढले आहे तर जिकडे तिकडे सांसारिक असंतोषच माजून राहिला आहे, असे बऱ्याच जुन्या व कांही नव्या पिढीतील स्त्रीपुरुषांचें म्हणणें आहे. एक सुशिक्षित तरुण गृहस्थ तर मला असें म्हणाले कीं, “ अहो, कसलं स्त्रीशिक्षण आणि कसलं स्त्रीस्वातंत्र्य तुम्ही घेऊन बसला आहांत ? स्त्रिया शिकूं लागल्या आणि संसारांत समाधान उरलं नाही. स्त्रिया स्वातंत्र्य मागूं लागल्या आणि संसारांतला आनंद नाहीसा होऊं लागला. त्यापेक्षां पुन्हां आपण आपले जुन्या काळाकडे जाऊं या हे बरं. नको बुवा ते स्त्रीशिक्षण ! ”

सदर गृहस्थांप्रमाणेच पुष्कळ ठिकाणी असे उद्गार ऐकूं येतात खरे. पण मला वाटतें, स्त्रीशिक्षणावर हे विनाकारण शितोंडे आहेत. वड्याचे तेल वांग्यावर काढावे त्यांतला हा प्रकार आहे. स्त्री ही पुरुषासारखीच मानवी प्राणी आहे हें मान्य केल्यावर, शिक्षण हे पुरुषाच्या बाबतीत अमृत ठरतें

तर स्त्रीच्या बाबतींत तरी ते विष कां ठरावे ? आणि ज्ञान हे जर अमृत आहे तर " स्त्रीशिक्षणाचा परिणाम विपरीत होतो आहे " अशी जी हाकाटी पुष्कळदां ऐकूं येते त्याला उत्तर काय ?

याचें उत्तर अनेकांनी अनेक वेळां दिलें आहे. तें नवीन मुळीच नाही. आमची शिक्षणपद्धतीच अद्याप सदोष आहे असें मोठमोठ्या तज्ज्ञांचें मत आहे. स्त्रियांना किंवा पुरुषांनाहि अनेक विषयावर भाराभर पुस्तकें असतात. पण प्रत्यक्ष जीवनास जेव्हा आरंभ होतो तेव्हां त्यांना समजतें की, आपण शिकलों त्या गोष्टींचा आणि आपल्या अनुभवास येणाऱ्या गोष्टींचा फार थोडा संबंध आहे. आपण शिकलों खरें, पण आपले प्रश्न आपण सोडवूं शकत नाहीं. अनेक शिक्षणतज्ज्ञाचे असें मत आहे की, मुलांमुलींना पुस्तकी शिक्षण पुष्कळ मिळतें, पण एकंदर जीवनाची रूपरेषा, प्रत्यक्ष व्यवहार, जीवनांतील अडीअडचणी याविषयी विद्यार्थीवर्ग अज्ञानांतच असतो. नाही तरी आयुष्य जगण्याचा काळ विद्यार्थीदशेनंतरच असतो.

मागल्या लोकाचे अनुभव जमेस धरून पुढच्यांनी आपलीं पावले टाकावीत हे खरें असले, तरी कोणत्याहि सामान्य माणसाच्या मनाची ठेवण अशीच असते की जे भूतकाळांत एकदां होऊन गेलें त्याची आठवण शिळी होऊन जाते. माणसाच्या डोळ्यांना जें प्रत्यक्ष दिसतें त्याचा ठसा त्याच्या अंतःकरणावर कायमचा उठतो. याचा अर्थ असा की, होऊन गेलेल्या इतिहासापेक्षां घडत असलेल्या इतिहासाचा परिणाम माणसाच्या मनावर अधिक होतो. भाड्याच्या घरांत राहून समजत नाहीत एवढ्या गोष्टी स्वतः घर बांधल्यावर समजतात. घर बांधून पहावे लागते. संसार हा जंजाळ आहे, की नंदनवन आहे हे ज्याचा त्यानें अनुभव घेतल्याशिवाय ठरविता येत नाही.

पण असें जरी असलें, स्वतःचा अनुभव स्वतःच घेतल्याशिवाय जीवनांतील प्रश्नांची नेमकीं उत्तरे माणसास सांपडत नसलीं, तरीं जीवन म्हणजे काय, आमचें जीवन कोणत्या रस्त्यानें जाणार आहे, त्यांत अडचणी कोणत्या, त्या टाळण्याच्या युक्त्या कोणत्या, आम्हीं काय केले म्हणजे आमचे जीवन सर्व बाजूंनीं अधिकांत अधिक समृद्ध होईल इत्यादि

प्रश्नांची रूपरेषा, आणि सामान्यमानानें त्याचे ठोकळ स्वरूप तरी निदान आम्हांस कल्पनेनें प्रतीत व्हावयास पाहिजे. भोंवतालच्या परिस्थितीचें आकलन करून त्यातून सावधनतेचे इशारे आम्हांस अचूक टिपून घेतां येतील अशा तऱ्हेनें आमच्या बुद्धीची वाढ झाली पाहिजे. आजच्या शिक्षणाने हा मानसिक विकास होतो असे वाटत नाहीं.

दिवसानुदिवस माणसाची देवाधर्मावरची श्रद्धा कमी होऊं लागली आहे. अंतःकरणांत ही श्रद्धा उरली नाही आणि नवी श्रद्धा निर्माण झाली नाही. त्यामुळें मनाच्या धर्मांना धड श्रद्धेचें अधिष्ठान नाही व बुद्धिप्रधान अशी वैचारिक ठाम बैठकहि नाहीं. ज्या श्रद्धा अंतःकरणांतून निघून चालल्या आणि ज्या श्रद्धेचा आदर बुद्धीला मानवेनासा झाला, ती श्रद्धा पुन्हा अंतःकरणांत प्रस्थापित करा या म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. माणसाच्या अंतःकरणात कोणत्याहि गोष्टी बळजबरीनें उत्पन्न होत नाहींत. हंसू आपोआप फुटावें लागते. श्रद्धा मुळांत असावी लागते. ती नसेल तर माणसाच्या मनाला वैचारिक अधिष्ठान जरूर हवे. बिनबुडाचें मन स्थिर नसतें. त्या मनाची मूळची बैठक पक्की नसते. ही बैठकच विचारानें पक्की व्हावयास पाहिजे. हें आजच्या शिक्षणपद्धतीनें होत नाहीं असें दिसते.

वाङ्मय, काव्य, इतिहास, भूगोल इत्यादि जे अनेक विषय आम्हांस शिकविले जातात त्यामुळें आमच्या बुद्धीला धार येते, कल्पनेची झेप वाढल्यासारखी होते. पण बुद्धीने चार—दोन विषय चाखून पाहिले, कल्पनेला अगोदर जाणीव होते त्यापेक्षां अधिक कांही समजूं लागले, तरी आमचा मानसिक विकास होईल, आमची सारासार विवेकशक्ति वाढेल, आम्ही सारख्या स्वप्नाळूच राहाणार नाही, परिस्थितीचें आकलन करून तोंड देण्याचा खंबीरपणा आमच्यांत निर्माण होईल आणि कल्पनेंतील काव्य व व्यवहारांतील रोकडे सवाल यांतील फरक समजण्याची पात्रता आमच्यांत येईल असे शिक्षण आम्हांस मिळावयास हवें आहे. ते मिळत नाही म्हणून शिक्षणाचे परिणाम जसे व्हावेत अशी आपली अपेक्षा असते तसे झालेले दिसत नाहीत. म्हणून मिळतं हेंच शिक्षण फार आहे, एवढें नसलें

तर बरें होईल असें वाटूं लागतें. त्यामुळें मुलींच्यासुद्धां अपेक्षा व वागणूक ही समंजसपणाची दिसत नाहींत.

आणि याबद्दल कोणी दोष दिला तर तो आम्ही स्त्रियांनीं कबूल केला पाहिजे हें खरें. पण स्त्री-शिक्षण हें याचें कारण नव्हे. स्त्रीस्वातंत्र्य हेंहि नव्हे. शिक्षणपद्धति सुधारा म्हणजे हे दोष नाहींसे होतील.

आतां संसारांतील समाधान नाहींसें होतें म्हणजे काय? तर सर्वांची ओरड अशी कीं अलिकडील शिकलेल्या मुलींना काम करावयास नको. नुसता ऐषआराम पाहिजे. स्वयंपाक, मुलांचें संगोपन, पाहुण्यांचें आदरातिथ्य, घरांतील माणसांशीं पटवून घेणे इत्यादि बाबतीचा त्यांना कंटाळा आहे. या शिक्षणानें हा सर्व घोटाळा केला.

स्त्रीशिक्षणासंबंधानें ही विनाकारण ओरड आहे. तरीपण पूर्वींच्या स्त्रियांतील कामसूपणा, सहनशीलता, दिवसभर कष्ट करण्याची संवय या गोष्टी आताच्या पिढीतील स्त्रियात थोड्या कमी आहेत हें खरें. पण पूर्वींच्या व आतांच्या पुरुषांच्या बाबतीतही हीच तक्रार करतां येईल. पूर्वींचे पुरुष पाण्याने भरलेली कळशी दांतांनीं उचलून आणीत होते. वीस वीस मैल पायीं चालत होते. दोनदोनशे नमस्कार घालीत होते. ही करामत, ही सर्कस आताचे पुरुष करून दाखवितील काय? तेव्हां या बाबतीत केवळ स्त्रियांवर घसरण्यात अर्थ नाहीं. अर्थात् एकानें गाय मारल्यावर दुसऱ्यानें वासरूं मारण्यांत शहाणपणा नाही हें खरें. पण मला एवढेंच म्हणावयाचें आहे कीं अलीकडील मुलींतच हा फरक झाला आहे असे नव्हे तर तो मुलांतहीं तसाच झाला आहे.

आणि दुसरी गंमत अशी कीं मुलींनीं स्त्रीस्वातंत्र्याचा झेंडा उभारण्यापूर्वींच पुरुषांनी पुरुषी अहंकाराचा झेंडा अगोदरच उंच फडकवीत ठेवला आहे. तो खाली घेण्यात त्यांना अजून कमीपणा वाटतो. पण या मुद्यावर मी आज जास्त लिहिणार नाहीं. कारण यासंबंधीं मी यापूर्वींच्या एका लेखांत लिहिले आहे. आणि आजच्या लेखाचा माझा मुख्य हेतु आमचें चुकतें कोठे, सुशिक्षित स्त्रियांसंबंधीं पुरुषाच्याहि काय अपेक्षा असतात व गृहिणी या दृष्टीनें स्त्रीच्या स्वातंत्र्याच्या, व्यक्तिमत्वाच्या मर्यादा कोणत्या असाव्यात हा आहे.

स्त्री ही सुशिक्षित असो की अशिक्षित असो, ज्या स्त्रीला संसार करावयाचा आहे—आणि बहुतेक सर्व स्त्रिया संसारच करणाऱ्या असतात–तिला संसारात आळस आणि केवळ ऐषआराम करून चालावयाचे नाहीं. पुरुषसुद्धां कांही नुसताच ऐषआराम करीत नाहीं. आपल्या संसारासाठीं दिवसभर त्यांच्या जीवाचा आटापीटा चाललेला असतो. मग तो बाहेरून आल्याबरोबर पत्नीनें थोडें त्याच्या तैनातींत राहिले तर त्यांत काय बिघडलें ? पण कांही स्त्रियांच्या स्त्रीस्वातंत्र्याच्या कल्पना फारच विपरीत असतात असे दिसते. " मी नाहीं रोज स्वयंपाक करणार. रोज रोज मलाच मुलांचे सारे बघावे लागते. हे बाहेरून आले की लगेच त्यांना चहा लागतो. इतके कोण बाई बांधील रहाणार यांच ? " असे त्या म्हणतात.

पण हे काहीतरीच नाही काय ? निदान जी पतिपत्नी एकमेकांना अनुरूप असतात, जी पतिपत्नी एकमेकांवर प्रेम करतात, ज्याचें विवाह स्वतःच्या पसंतीनें झालेले असतात त्यांच्या बाबतीत तरी असे होऊं नये. दिवसभराच्या दगदगीने कंटाळून पति घरी येतो तेव्हा त्याला साहजिकच वाटतें की, पत्नीने स्वतः चहा करावा आणि आरामखुर्चीत बसून आपण तो घ्यावा. तिच्याबरोबर गप्पा मारीत बसावे, फिरावयास जावे, यांत अस्वाभाविक असें काय आहे ? सहजीवनाचा आनन्द उपभोगण्यासाठीच त्याने आणि तिनेसुद्धां लग्न केलेले असते ना ? कांहीं काळ तरी एकमेकाचें निराळेपण विसरून, जीवाभावाचे हितगुज करावे, एकमेकाचा आनंद द्विगुणित करावा असे पतीस वाटणे व त्याची ती अपेक्षा पत्नीने आनंदानें झेलून घरणे यांत अनैसर्गिक, अस्वाभाविक किंवा स्त्रीस्वातंत्र्यावर घाला पडण्यासारखें काय आहे ?

स्वातंत्र्य याचा अर्थ बेछूटपणा किंवा बेपर्वाई असा मुळीच कोणीहि केलेला नाहीं. पतीला पत्नीने स्वतः स्वयंपाक करून वाढणे यातच खरे काव्य आहे. पतीलाहि पत्नीच्या हातचाच स्वयपाक आवडणे यातहि रसिकताच नाही काय ? पति जेव्हां पत्नीच्या हातचा स्वयंपाक जेवण्याची इच्छा दर्शवितो तेव्हां तो कांहीं त्याचा अरेरावीपणा नसतो. ते पत्नीबद्दलचें त्याचें प्रेमच आहे हें पत्नीने समजून घेतलें पाहिजे. एखादी विदुषी पत्नी जर म्हणेल कीं, " मला काव्याची स्फूर्ती केव्हां येईल आणि केव्हा नाही याचा

कांही नेम नाही, पतीला वाढता वाढतां मला जर दोन ओळी सुचल्या तर मी मध्येंच उठून कविता लिहावयास जाणार. पतीनें मग तेव्हां मला आडवितां कामा नये," तर मी म्हणेन जरूर अडविलें पाहिजे. भलत्याच वेळी स्फूर्ति येऊन कसें चालेल बरें? जेवतांना कविता करून कसें पोट भरेल? संसार हें जीवन आहे, कीं काव्य हे जीवन आहे? मूर्तीमंत काव्य समोर असतांना त्या काव्याशीं बोलावयाचे, हसावयाचे, ते काव्य डोळे भरून पहात रहावयाचें कीं खरेंखुरे चालते बोलते काव्य दृष्टीआड करून निर्जीव कागद पेन्सीलीच्या सहवासांत बसावयाचें? जेवण अर्धवट टाकून अकाली स्फुरलेल्या काव्याच्या ओळी लिहिण्यापेक्षां पतीला आग्रहानें चार पुऱ्या जास्त वाढण्यांत खरें काव्य आहे.

माणसाची सारी धडपड नाहीतरी कल्पनेंतील काव्य प्रत्यक्षात जगावयाला मिळावें यासाठीच असते. ते सोडून तो जर नुसत्या काव्यकल्पनेंत सदैव दंग झाला असता तर त्याच्यावर एवढे उसासे सोडण्याचे प्रसंगच आले नसते. लिहिलेल्या काव्याची महति कमी समजण्याचा माझा हेतु नाहीं. स्त्री-शिक्षणाची आणि स्त्रीस्वातंत्र्याची मी भोक्ती आहे. पण लिहिलेले काव्य माणसाला क्षणभराची सोबत करील तर अनुभवलेल्या काव्यावर माणूस सबंध जीवनहि जगूं शकेल. काव्य केवळ लिहिणारापेक्षां काव्य जगणारा माणूस एक प्रकारें भाग्यवान समजला पाहिजे.

स्त्रीपुरुष कितीहि सुशिक्षित असले, तरी ज्यानीं प्रीतिविवाह केले आहेत, ज्यांची लग्नें अनुरुप ठरली आहेत त्यांनी आपल्या व्यक्तिमत्वाचे फाजील देव्हारे माजविण्यांत कोणतेच शहाणपण नाहीं. आमच्या भावना ओळखल्या पाहिजेत असें आम्ही स्त्रिया म्हणतों तेव्हां पुरुषाच्या भावना ओळखण्याची जबाबदारी आमच्यावर आपोआपच येते. पतिपत्नीत असलेलें प्रेम त्यागाशिवाय, सहनशीलतेशिवाय टिकूं शकणार नाही; आणि काटकसर, कामसूपणा, स्वच्छता यांशिवाय संसार होणार नाही. या गोष्टी आम्ही करणार नाहीं असें कोणत्याहि स्त्रीनें म्हणून चालावयाचें नाही. संसारांत नुसतीच गम्मत आणि मौज नाहीं. त्याच्या जोडीला जबाबदाऱ्याहि आहेतच याचीच जाणीव लग्नापूर्वी स्त्रीला पुष्कळदां झालेली नसते, आणि तीच

होणें जरूर आहे. संसारांत पडावयाचें तर जबाबदाऱ्या संभाळणेंहि ओघानेच आलें.

बाल संगोपनाबद्दलहि हेंच म्हणतां येईल. "मुलांचें मलाच करावें लागतें" अशी कुरकुर करण्यांत काय स्वारस्य आहे ? निसर्गानें जो पक्षपात केला त्याला कोणाचाच इलाज नाहीं. आणि निसर्गाला शिव्या देऊन तो कांही आपल्यांत कधी सुधारणा करावयाचा नाहीं. ज्या स्त्रियांना संसाराच्या या कटकटी नको असतील त्यांनी संसारात न पडणेंच उत्तम ! ज्यांना संसार करण्याची इच्छा आहे त्यांनी संसाराच्या निम्या जबाबदाऱ्या हंसतमुखानें उचलण्याची तयारी करणें जरूर आहे. ससारांत पडावयाचे तर "मला मुलें आवडत नाहीत" असें स्त्रीने म्हणून चालावयाचें नाही. मुलें किती असावींत हा दोघांच्या सहकार्याने सुटणारा प्रश्न आहे, तो ज्यांचा त्यांनीं एक विचारानें सोडवावा. पण मुलांचे व्यवस्थित झालेंच पाहिजे या गोष्टीवर आई या नात्याने स्त्रीचा विशेष भर असावयास पाहिजे.

यासाठी जी स्त्री मुलांची जबाबदारी पत्करणार ती सुशिक्षित असणे अत्यंत जरूर आहे. हा मुद्दा मी पूर्वीच्या एका लेखांकांत मांडलेला आहे. पण आई सुशिक्षित असावी या म्हणण्याचाहि अर्थ हाच आहे की मुलांचे शारीरिक, मानसिक व बौद्धिक संवर्धन बापाइतकेच आईवरहि अवलंबून आहे. हल्ली मुलांचे पाठांतर फार कमी झाले आहे. पण आईने आपल्या मुलाचा अभ्यास व त्याचें पाठान्तर करून घेणे ही तिचीच जबाबदारी आहे. वडिल दिवसभर कामावर गेलेले असतात. त्यामुळे मुलांना शिकाविण्यासाठी त्याना वेळ मिळणे बहुधा कठीण असतें. तेव्हां आईवरच हें काम आलें. या बाबतीत वेळ होत नाही वगैरे ठराविक सबबी सांगण्यांत कांहीं मौज नाहीं. चोवीस तास काही आई कामांत गुंतलेली नसते. तेव्हां मुलांच्या संवर्धनाकडे तिनें लक्ष पुरविणें ही तिची जबाबदारी आहे व ती तिला टाळतां यावयाची नाही.

हें सर्व करतां यावें यासाठीं लग्नापूर्वी प्रत्येक स्त्रीला बालसंगोपनाची माहिती असणें फार महत्त्वाचें आहे. बालसंगोपन, साध्या आजारावरील औषधें, आरोग्याची कल्पना, स्वयंपाकाचें तंत्र, सकस अन्नाची माहिती व मुलांचें मानसशास्त्र इत्यादि गोष्टींची बरीचशी कल्पना

लग्नापूर्वीच मुलीला आणून दिलेली असणें जरूर आहे. मुलांची काळजी समजून उमजून न घेणाऱ्या स्त्रिया माझ्या फारशा पाहाण्यांत नाहीत, थोड्याशा आहेत. पण याबाबतीत लोकमत थोडेंसें असें आहे की अलीकडच्या मुलींना बालसंगोपनाबद्दल अनास्थाच आहे.

एक उदाहरण तर मी असें बघितले आहे की डोळ्यांनी बघूनहि माझा त्या गोष्टीवर विश्वास बसेना. बी. ए. झालेली मुलगी. लग्न झाल्यानंतर दीड दोन वर्षांनी तिला मुलगा झाला. मुलगा झाला तेव्हां चांगला सशक्त होता. पण मुलाला अंगावरचे दूध पाजल्याने आपलें शरीरसौंदर्य कमी होणार याची त्या मुलीला धास्ती पडली म्हणून ती त्याला वरचे दूध घालूं लागली—म्हणजे काय, तिची मोलकरीण घालूं लागली. आई बाळंतपणानंतर पंधरा दिवसांतच मोटारीतून फिरावयास जाऊं लागली. महिन्या दोन महिन्यात तो मुलगा रिकेटी झाला. आणि त्याला फिटस् येऊं लागल्या. तरीहि बाईचे फिरावयास जाणे सुरूच होते. नवराहि तिच्या म्हणण्याबरहुकूम वागत होता.

एकदा या बाईसाहेब फिरावयास निघाल्या आणि मुलाला फिट् आली. त्याने डोळेच फिरविले. बरे, आईचें फिरणे चुकले की तिच्या सौंदर्यावर परिणाम होणार ! ती भडकली. आणि " ढोंग करतो, लुच्चा !" म्हणून त्या कोवळ्या पोराच्या माडीवर चांगल्या सटासट् तीनचार चापट्या तिनें मारल्या. मारामुळे पोरगे फिटमधून ताबडतोब शुद्धीवर आलें खरे, पण डॉक्टर त्या बाईला म्हणाले, 'तूं शुद्ध राक्षसीण आहेस. आई होण्याची लायकी नाही तुझी.'

असले हे उदाहरण पाहिले, त्यांतून सुशिक्षित मुलीनें केलेलें ऐकले कीं, लोक म्हणणारच की हा स्त्रीशिक्षणाचा परिणाम ! म्हणून शिकलेल्या मुलींवर समंजसपणा दाखविण्याची जास्त जबाबदारी आहे; पण म्हणणारांनीहि हें ध्यानांत ठेविले पाहिजे कीं असली उदाहरणें अगदीं क्वचित्, अपवादात्मक असतात. शिकलेल्या मुली अशा मूर्ख नसतात. शिकलेल्या मुलींत यांचे जेवढें प्रमाण दिसेल तेवढेंच किंबहुना जास्तींच अडाणी मुलींतहि दिसेल. वर मी जें उदाहरण सांगितले ती मुलगी शिकलेली होती म्हणून तिनें असें केलें असें मुळींच नाही. तिचा स्वभावच तो ! ती शिकलेली होती म्हणून

नुसत्या चापट्यावरच त्या मुलाचे निभावले. ती शिकलेली नसती, अडाणी असती तर तिनें आणखी काय केले असते हे सांगवत नाही. ज्यांचा स्वभाव असा क्रूर, निर्दय किंवा बेपर्वा असतो त्या स्त्रियांना सौजन्याचे महत्त्व जर कधी समजलेच नाही तर, त्या सुशिक्षित असोत, की अशिक्षित असोत थोड्याफार फरकाने पण एकाच पद्धतीने वागतात. फक्त वागण्याची कारणें त्या निरनिराळीं सांगतात एवढेच. अडाणी स्त्री कारणमीमांसा पुढें करणार नाहीं, नुसतीच आदळआपट करील आणि शिव्याशाप देईल. आणि चार पुस्तकें वाचलेली स्त्री शरीरसौन्दर्याचें आणि मानसशास्त्राचें एखादें कारण दाखवील, एवढाच फरक.

मुद्दा हा आहे की पुस्तकें वाचण्यावरच मनाची सुसंस्कृतता अवलंबून आहे काय ? शिक्षणाने मने सुसंस्कृत होतात–व्हावयास हवीत ही अपेक्षा बरोबर आहे. आणि कितीहि ओरड केली तरी शिक्षणाने मनावर चार चागलें संस्कार घडल्याशिवाय राहात नाहीत हे खरेच आहे. पण वैचारिक कार्यक्षमता अंगी येण्यास आजच्या शिक्षणाचें सामर्थ्य तोकडें पडतें आहे. शिक्षणाचे कार्य हे आहे की माणसाचे मन सुसंस्कृत, विकसित झालें पाहिजे. कोणाचे थोड्या शिक्षणानेंहि होईल, एखाद्याला उपजतच शहाणपण जास्त असेल किंवा एखादा डिग्र्या घेऊनहि अडाण्यासारखा वागेल. हे ज्याचे त्याचे मनोधर्म आहेत, ही ज्याची त्याची विचारशक्ति आहे. परीक्षेला बसणाऱ्या विद्यार्थ्यांना एकच अभ्यासक्रम असतो, तेच शिक्षक असतात, आणि तेवढाच वेळ असतो. पण असें असूनहि सर्वांचे मार्क्स सारखेच कां असत नाहीत? शिक्षण तेंच, संस्कारहि तेच, पण प्रत्येकाच्या बाबतींत परिणामाचें मान कमी अधिक होतें. याचें कारण प्रत्येकाची निराळी बुद्धि, प्रत्येकाचे निराळे मनोधर्म, प्रत्येकाची निराळी ग्रहणशक्ति हेंच आहे. शिक्षण तत्त्वतः वाईट नाही. बी. ए. झालेल्या सर्वच मुली अशा असतात असा समज करून घेणे हा गैरसमज आहे. आणि जी मुलगी आपल्या अर्भकाशीं वर लिहिल्याप्रमाणे क्रूरपणाने वागूं शकते ती बी. ए. असली तरी तिला सुशिक्षित तरी कसें म्हणावें ?

पण सुशिक्षित मुलीवर या आक्षेपाचा थोडासा जरी अंश येऊं पाहात असला तर त्यानी तो अगोदर नाहींसा करणें जरूर आहे. नाहीं तर सुशि-

क्षित मुलींच्यावर आक्षेप घेणाऱ्याची संख्या वाढेल. आणि आतांच कोठें स्त्रीशिक्षणाला भरती येत आहे. त्यांत हा एक नवा अडथळा येऊन उभा राहील.

आतां आणखी एक आक्षेप राहिला. पाहुण्यांचे आदरातिथ्य.याबाबतींत मात्र मला सुशिक्षित मुलींच्या तक्रारीचा विचार करावासा वाटतो. स्त्रियांनी संसार करावयाचा म्हणजे स्वयंपाक, बालसंगोपन, आदरातिथ्य इत्यादि निरनिराळे विभाग त्यांत आले हे खरे. या दृष्टीने आतांपर्यंत स्त्रीच्या सांसारिक जबाबदाऱ्या मी सांगण्याचा प्रयत्न केला. पण आदरातिथ्याच्या बाबतींत मला मुलींची बाजू न्यायाची आहे असे वाटते. आमच्याकडे पाहुण्याराउळ्यांनी वेळी अवेळी हवा तसा धुमाकूळ घालण्याची फार वाईट पद्धत आहे. जों जों भलेपणानें वागावे तो तो आदरातिथ्याचे घोंगडे गळ्यात येऊन पडते. पाहुण्यांचा कंटाळा करावा अशा अर्थाने मी हे लिहीत नाहीं हे मला अगोदरच स्पष्ट केले पाहिजे. पण संसार राजाराणीचा असो की कुटुंबात पुष्कळ माणसे असोत, सर्वसाधारण घरांतील स्त्रियानाच चहापाणी, खाणेंपिणें, जेवणें, उष्टीखरकटी याची उसाभर करावयाची असते. त्यांनी जर चोवीस तास राधा, वाढा, उष्टीं काढा यांतच गुरफटून पडावयाचे तर मग इतर व्यवसाय, महत्त्वाची कामे केव्हां करावयाची?

पूर्वीच्या बायका चोवीस तास त्याच उसाभरींत गुरफटलेल्या असत. कारण याशिवाय दुसरें व्यवधान त्यांच्या मनाला नव्हतें.पण आतां मुलींना काहीं वाचावेसें वाटले, लिहावेसें वाटलें, एखाद्या क्लासांत जाऊन काही शिकण्याची त्यांना इच्छा असली, तर त्यानी हे उद्योग केव्हा करावेत? कित्येकाच्या घरीं तर त्यांच्या भोवती माणसांचा सारखा गराडाच पडलेला असतो. चहापाण्याची धामधूम चालू असते. कांहीना हे आवडतेंहि; पण चोवीस तास डोक्याशी माणसे असली तर गृहिणीला विश्रांति तरी कधी मिळावयाची? तेव्हां आजच्या मुलींना सारखें त्याच त्याच गोष्टींत गुरफटून राहावें हें पसंत पडण्यासारखें नाहीं. त्यांनासुद्धां फिरायला जातां आलें पाहिजे. त्यांनाहि व्याख्यानें ऐकावयास मिळाली पाहिजेत. कोणी स्त्रिया उपेक्षेनें जात नसतील तर त्यांना पुरुषवर्गानें आपल्याबरोबर यावयास भाग पाडलें पाहिजे.

असो. पाहुण्यांचें आदरातिथ्य हा स्त्रीजीवनांतील एक महत्त्वाचा मुद्दा आहे हे खरें; पण मुलींना आपल्या भावी आयुष्यांत उपयोगी पडेल असें शिक्षण मिळालें पाहिजे. शाळा–कॉलेजांतूनसुद्धां पुरवणी वाचनाला जीं पुस्तकें नेमतात तीं पुस्तकें अशी असावीत की मुलींना–मुलांनासुद्धां–आपल्या भावी आयुष्याबद्दल कांही अंदाज करतां यावा. वैवाहिक जीवन, कुटुंबसंस्था, विवाह-संस्था सांसारिक जबाबदाऱ्या वगैरे गोष्टींचें जरूर तें ज्ञान त्यांना करून देणें फार महत्वाचें आहे. त्या दृष्टीने २–३ वर्षांपूर्वी बी. ए. ला नेमलेलें आचार्य अत्र्यांचे " उद्यांचा संसार " हें नाटक फारच सुंदर व उद्‌बोधक आहे. नवीन पिढीनें शिकण्यासारखें, जागें होण्यासारखे त्यांत पुष्कळच आहे. शाळा–कॉलेजात शिकणाऱ्या विद्यार्थी–विद्यार्थिनींचे वय बहुधा पंचवीसच्या आंतच असतें. आणि गद्धेपंचविशी हे कोणाचेंहि वय असें असतें की, मूर्खपणा करण्याच्या संधि माणसाला जास्त मिळतात.

तेव्हां शहाणपणाच्या चार गोष्टी ऐकलेल्या असल्या, निदान धोक्याच्या जागी कोणी लाल कंदील दाखविला तर पंचवीसाच्या आंतल्या मुली किंवा मुलगेसुद्धां जागें होण्याचा शहाणपणा दाखवितात. बाकी विवाह आणि संसार ही एकच गोष्ट अशी आहे की, हजारों वर्षे या विषयावर अनेक लोकांनी लिहिलें, असंख्य लोक यावर बोलले, अगणित लोकांनी ते विचार वाचले किंवा ऐकले, पण ह्या विषयाला कांहीं अंत नाहीं. या विषयाचा कांहीं कोणाला कंटाळा येत नाही. आणि एवढें होऊन यांतून कांहीं नेमका मार्ग निघत नाहीं. स्त्रीपुरुषांतील आकर्षण–मग तें शारीरिक म्हणा कीं बौद्धिक म्हणा कायम आहे तोवर हें असेंच चालावयाचें. पुष्कळदां ज्याचा त्यानें अनुभव घेऊन शहाणे व्हावयाचे असते असें जे अनुभवी लोक म्हणतात त्यांत बरेच तथ्य आहे.

• • •

# पुनर्विवाह : : ७

स्त्रीचा पुनर्विवाह ही गोष्ट आजच्या काळांत कोणाला नवीन राहिलेली नाही. पहिला नवरा मेल्यानंतर परावलंबी जीवन जगून जन्मभर कुचंबणा करून घेण्यापेक्षां विधवा स्त्रीनें पुनर्विवाह करावा असें गेलीं पन्नास–साठ वर्षे तरी समाजसुधारक सांगत आलेले आहेत. महर्षि धोंडो केशव कर्वे यांनीं पुनर्विवाह केला तेव्हां त्यांचा छळ किती झाला, इत्यादि गोष्टी आतां सर्वांना विदित आहेतच. त्यांच्या काळीं ज्या ज्या कोणी तुरळक व्यक्तींनी खरीखुरी सुधारणा कृतीनें करून दाखविली त्या त्या स्त्रीपुरुषांचे असेच हाल, अपमान झालेले आहेत.

पण आज आता ती स्थिति राहिलेली नाही. सरसकट पुनर्विवाहाचें समर्थन जरी होत नसलें, पुनर्विवाह ही गोष्ट अजूनहि जरी कमी दर्जाची मानली जात असली, तरी पूर्वीच्या विरोधाचें स्वरूप आता राहिलेले नाहीं. याचे कारण परिस्थितीनें, शिक्षणानें माणसाच्या मनावरील धार्मिक संस्कार थोडे बदलले आहेत, नकळत बदलत गेले आहेत. पुनर्विवाहास विरोध करणारे लोक अजूनहि आहेत. विधवा मुलीनें लग्न न करतां आजन्म कुचंबणा करून घेतली, तर तिचें जिणें श्रेष्ठ दर्जाचें आहे, असे समजणारीं माणसें अजून पुष्कळच आहेत. मग तिचें मन मृत पतीच्या स्मृतीवर प्रेम करीत नसले तरी चालेल. पण जिला देवाधर्मात, समाजसेवेंत, आपल्या आप्तेष्टात मन गुंतविता येत नाही तिने नाईलाजानें पुनर्विवाहाची पाऊलवाट अनुसरावी, मात्र होतां होईतों त्या मार्गानें जाऊं नये, कारण तो राजमार्ग नव्हे, असे विचारप्रवाह अजूनहि आमच्याकडे वहात आहेत. कारण स्त्रीचा पुनर्विवाह ही गोष्ट निषिद्ध असल्याचें आमच्या शास्त्री–पंडितांनीं आम्हांला सांगितलें. त्याचा परिणाम इतका वज्रलेप होऊन बसला कीं एका पत्नीच्या

मृत्यूनंतर पुरुषाचा पुनर्विवाह सर्वस्वीं योग्य ठरतो मग स्त्रीचा तरी अयोग्य कां ठरावा, असे कोणाच्या मनांत आले नाही.

नैतिक बंधनें स्त्रीपुरुषांना सारख्याच तऱ्हेनें बंधनकारक नव्हती, अजूनहि नाहींत. आणि याची कोणी फारशी दखल घेतली नाहीं. शरीरशास्त्र,मानसशास्त्र यांच्या सल्ल्यानें स्त्रीच्या पुनर्लग्नाचा विचारच झाला नाही. पहिली पत्नी गेल्या-नतर लोकानी " झालें गेलें विसरून जा " असा उपदेश विधुरांना करून पुन्हां अंतरपाट धरण्याची व्यावहारिक घाई केली. पण दहा वर्षांच्या विधवा मुलीला हा उपदेश कोणी केला नाही. कारण मुलीलाहि झाले गेलें विसरणें जरूर आहे, नैसर्गिक आहे याची जाणीवच त्यावेळी कोणाला नव्हती. आमचे सर्व नियम, रुढी ह्या पारमार्थिक कल्याणावर विसंबून होत्या. स्त्रियाच्या बाबतींत तर त्या विशेषच होत्या. स्त्रीचा जन्म, स्त्रीची मूर्ति ही अनेक पापांची मोठी खाणच होती. तिला जेवढी बंधने घालावीं तेवढी थोडीच; तिला जेवढी जखडून टाकावी तेवढ्या लौकर ती आपला आणि आपल्या बेचाळीस कुळाचा उद्धार करणार. अशा कल्पना त्या काळी लोकांत प्रसृत असल्यानें शरीरशास्त्र, मानसशास्त्र, नैसर्गिक प्रवृत्ति यांचा समावेश स्त्रीजीवनाचा विचार करताना मुळी झालाच नाही. जेव्हां झाला तेव्हा उलट अर्थानेच झाला.

स्त्री ही पतिनिधनानंतर विरक्त होते, असे त्या वेळच्या समाजशास्त्रज्ञांनीं गृहीत धरले होतें असे वाटत नाही. तशी विरक्ति तिच्या टायी आपोआप निर्माण होत असती तर विधवाधर्म निराळा सांगण्याची जरूरीच नव्हती. पण विधवा स्त्रीनें विरक्त असावें यावर मात्र त्या काळी समाजाचा कटाक्ष होता. म्हणून तिची वैराग्यवृत्ति वाढेल असे आचार, नेमधर्म त्यांनीं तिला सांगितले. एवढेंच नव्हे तर मुळांत शास्त्राधार नसलेली केशवपनासारखी दुष्ट, राक्षसी रूढीहि सुरू केली. आजहि ही रुढी नाहीशी होत असलेली दिसली तरी सकेशांच्या हातचें न खाणारे, श्राद्धपक्षादि स्वयंपाकांत तिचा स्पर्शहि न चालणारे महाभाग या विसाव्या शतकांत आहेत. पुरुषांबरोबर स्त्रियाहि आहेतच. पण त्यांच्यासंबंधी लिहिण्याची आतां जरूरी नाहीं. त्यांच्या मतांत बदल होणें जवळजवळ अशक्यच. शिवाय हीं माणसें आतां जुन्या पिढींत जमा झालेलीं आहेत.

पण स्त्रीचा पुनर्विवाह हा पुरुषाच्या पुनर्लग्नासारखाच शास्त्रशुद्ध, न्यायाचा आणि पवित्र आहे, हे शास्त्री–पंडितापैकी जे समाजसुधारक आहेत, त्यांनी शास्त्राधार दाखवून लोकांना पटविलें पाहिजे. तो त्यांचाच अधिकार आहे. स्त्रीचा पुनर्विवाह शास्त्रानें योग्य आहे असे समाज–सुधारकांनीं, शास्त्र जाणणारांनी लोकाच्या मनावर ठसविले म्हणजे पुनर्विवाहासंबंधीं आजहि दिसणारी अनास्था कमी होईल. माणसांना बुद्धीनें एकादी गोष्ट पटते. पण संस्कारांचा पगडा असा विलक्षण असतो की विचारांनीं पटणाऱ्या गोष्टीच्या कल्पनासुद्धां माणसाला दुःसह होतात. असें होऊं नये म्हणून विचारांनी पटणाऱ्या गोष्टी भावनेलाहि झेंपतील असे नवे संस्कार माणसांवर होणें जरूर आहे; आणि हे अवघड काम समाजांतील विद्वान्, विचारी, शास्त्रीपंडित असलेल्या समाजसुधारकांचेच आहे. त्यांनीच हें अधिकारानें सांगितलें म्हणजे लोक विचार करूं लागतील.

पन्नास साठ वर्षांपूर्वीं जेव्हां बालविधवेचा पुनर्विवाह व्हावा असे समाजसुधारक सांगत होते त्यावेळीं बालविधवेच्या परावलंबी जिण्याचाच विचार त्यांना प्रामुख्यानें करावा लागला. कारण त्यावेळी स्त्रीशिक्षण अजिबातच नव्हतें. रूढीचें आणि धार्मिक संस्कारांचें भलतेंच दडपण जनतेच्या मनावर होतें. एकत्र कुटुंबपद्धति सर्रास होती. त्यामुळें अन्नावारी राबणारी मोलकरीण असें विधवेचें जिणें होतें. आर्थिक परावलंबन, शारीरिक काबाडकष्ट, मानसिक कुचंबणा, बंधनांची पराकाष्ठा, अशुभ दर्शन आणि जन्मभर राबून तिच्चीच अडचण ही विधवा स्त्रीच्या जीवनाची रोजनिशी होती.

आजहि खेड्यापाड्यांतील पांढरपेशा समाजांतील विधवांची हीच स्थिति आहे. किंबहुना जी जी विधवा आजच्या घटकेला आर्थिकदृष्ट्या परावलंबी आहे, किंवा आर्थिकदृष्ट्या मृत नवऱ्याच्या संपत्तीचा आधार असूनहि जी एकत्र कुटुंबपद्धतींत सासऱ्याच्या किंवा दिराच्या ताब्यांत आहे, ती खेड्यांत किवा शहरांत असली तरी तिचें जिणे असेंच आहे.

अशी वस्तुस्थिति पन्नास वर्षांपूर्वीं फार मोठ्या प्रमाणांत असल्यामुळें स्त्रीनें पुनर्विवाह करावा हे सांगण्यांतील मुख्य हेतु, तिची या परावलंबी जिण्यांतून मुक्तता व्हावी हाच प्रामुख्यानें होता. सांसारिक सुखोपभोग घेण्याचा तिचा न्याय्य हक्क आहे हें सांगण्यापेक्षांहि, “ घरांतील एक अड-

गळ " हें तिच्या जीवनाचें स्वरूप नाहीसें झालें पाहिजे, तिचें मानहानीचें जिणें संपलें पाहिजे, हा हेतु यांत प्रामुख्यानें होता. आणि त्या वेळच्या परिस्थितीचा विचार करतां या हेतुला प्राधान्य होतें हें बरोबरच आहे. इतरांना अडगळीसारखें वाटणारें आयुष्य संपवावयाचें असेल, तर तिनें प्रथम आर्थिकदृष्ट्या स्वावलंबी झालें पाहिजे हें सांगणें बरोबरच होतें. शिवाय लोकांनाहि विधवा मुलीने एकदम पुनर्विवाह करावा यापेक्षां शिक्षण घेऊन स्वतःचा भार कोणावर टाकूं नये या गोष्टी लौकर पटण्यासारख्या होत्या. कारण या सुधारकी विचारांना, धार्मिक संस्कार फारसे दडपण आणूं शकत नव्हते. आणि विधवा मिळवती झाल्यानें तिच्या पालकांच्यावरील भार हलकाच होत होता.

पण केवळ आर्थिकदृष्ट्या स्वावलंबन आल्याने विधवेचा प्रश्न सुटत नाही. पूर्वीच्या स्त्रियांना शिक्षणच नव्हते. म्हणून धार्मिक श्रद्धेमुळें घातलेली बंधनें त्या निमूटपणें सहन करीत. स्वतःची जीवापाड कुचंबणा करून घेऊन घाण्याला जुंपल्याप्रमाणें ठरलेल्या मार्गानें जात. पण शिक्षण मिळूं लागलें, एकंदर रोजच्या कार्यक्रमात धार्मिक आचार–विचारांचा कडकपणा कमी झाला, तसतसे विधवेच्या लग्नाचा विचार मानसशास्त्रीयदृष्ट्या होणें अगत्याचें होऊन बसलें आहे.

पुरुषाने प्रथम पत्नी गेल्यानंतर दुसरी पत्नी करण्याचे जें नैसर्गिक कारण आहे तेंच कारण विधवा स्त्रीच्या बाबतींतहि आहेच. पुरुषाला स्त्रीसहवासाची शी जरूरी असते, तशीच स्त्रीलाहि पुरुषाच्या सहवासाची गरज असतेच. प्रथम पत्नी गेल्यानंतर पुरुष जसा विरागी, बरागी, संन्यासी होत नाहीं, तशीच स्त्रीहि वृत्तीनें संन्यासी होत नाहीं. तिनें संन्यासी असावें अशी अपेक्षा धरण्याची अनैसर्गिक संवय आपल्या मनाला लागलेली आहे, म्हणून आजन्म ब्रह्मचर्य पाळणाऱ्या विधवेचें कोणीच कौतुक करीत नाहीं, एवढें कौतुक ब्रह्मचर्य पाळणाऱ्या पुरुषाचें केलें जातें. कारण स्त्रीपुरुषांना एकमेकांचा सहवास पतिपत्नी म्हणून प्रिय असतो, जरूर असतो असें एकदां गृहीत धरूनहि, विधवेला मात्र तो निषिद्ध आहे अशा खोट्या, अस्वाभाविक कल्पना आम्ही उराशीं कवटाळल्या.

पण माणसांनीं काहींहि समजलें तरी निसर्गाचे कार्य त्याच्या ठरलेल्या

पद्धतीनें चालूंच असतें. ज्या स्त्रीचा संसार वीस पंचवीस वर्षे प्रेमानें, सुखा-समाधानानें झाला आहे, तिला पतिनिधनानंतर त्याच्याच स्मृतीवर जगावें असे वाटेल हें साहजिक आहे. पण ज्यांचे संसार अर्धवटच झाले, त्या स्त्रियांना कांहीं काळ गेल्यानंतर आपण पुन्हां संसार करावा असे वाटत असतें यांत मुळीच शंका नाहीं. पुरुषाच्या सहवासाची ओढ, निसर्गसहज शृंगाराच्या भावना या तरुण स्त्रीच्या ठायीं असणें अगदीं सहाजिक आहे. त्यांचा कोंडमारा होऊं न देणें हाच सुविचार आहे. नाहीं तर पावित्र्याच्या कल्पना उराशीं धरून माणसांनी बंधनें घालून घ्यावीं आणि एखादे वेळीं मनावरचा ताबा सुटून पाय घसरून पडावे, अशी विधवा स्त्रियांची उदाहरणें काय थोडी आहेत ? अशा तऱ्हेने जगांतून उठण्याची वेळ विधवेवर येतां कामा नये. या दृष्टीनेंहि स्त्रीच्या पुनर्विवाहाकडे पहाण्याचा काळ आतां आला आहे.

आजच्या विधवेला पारमार्थिक कल्याणाचे आकर्षण वाटणें अशक्य आहे. ज्यांचें वय संसार करण्याचें आहे त्यांच्या मनाची ओढ सांसारिक जीवनाकडे असणें हे स्वाभाविक आहे. अत्यंत नैसर्गिक, अटळ गोष्टींवर बंधनें घातलीं गेलीं म्हणजे काय परिणाम होतात हें अनाथ महिलाश्रमांचे वृत्तांत वाचल्यानें सहज कळून येते. पुरुषाप्रमाणेंच विधवा स्त्रीला नैसर्गिक भावनांचें आकर्षण टाळतां येणे कठीण असते. वैवाहिक जीवनाचे प्रलोभन तिच्याहि मनाला असतें, हें समाजांत दिसणाऱ्या अनेक विधवांच्या उदाहरणांवरून सहज दिसून येण्यासारखें आहे. त्याला कोणा मोठ्या मानसशास्त्रज्ञाची जरूरी नाहीं.

या गोष्टीची संपूर्ण जाणीव समाजाने घेतली, शरीरशास्त्र, मानसशास्त्र यांच्या विचाराने विधवा स्त्रीच्या लग्नाची आवश्यकता समाजास पटली म्हणजे पुनर्विवाहाचें समर्थन करणे कोणास अवघड वाटणार नाही. आजहि पुनर्विवाह सरसहा सुरू नाहीत. कित्येक विधुर पुरुष पुनर्विवाह करण्यास तयार असतात. पण पुनर्विवाहास तयार असणाऱ्या मुलीच त्यांना मिळत नाहींत. ही गोष्ट शहरांत राहाणाऱ्या स्त्रियांची आहे. मग खेड्यांतील स्त्रियांना अजून पुनर्विवाह करण्याचें धैर्य होत नाहीं यांत नवल काय ?

पण पुनर्विवाहाचें उघड उघड धैर्य होत नाही म्हणून, निश्चयाने त्या आपले मन संसारांतून काढून घेतात असे तरी होतें काय ? मुळीच नाहीं.

कोणी आजारी होतात. कोणी वेड्या होतात. कोणी कुढ्या, चिरचिऱ्या स्वभावाच्या होतात तर कांही कायमच्या उदास, विषण्ण होऊन बसतात. समाजसेवेसारख्या कार्यात मग्न होणाऱ्या स्त्रिया हाताच्या बोटांवर मोजण्याइतक्या निघतील. सासर–माहेरच्या कुटुंबांत चारित्र्याने शुद्ध राहून ज्यांच्या वयाची पन्नास–पन्नास वर्षे गेलेली असतात त्यांचे नकळत निघणारे उद्गार ऐकले, तर ते उद्वेगानें कसे कडवट झालेले असतात हे समजून येते. दहादहा वर्षे निर्धाराने रहाणाऱ्या स्त्रियांच्याहि आयुष्यांत असा एखादा मोहाचा क्षण येतो की तेवढ्यानें त्यांनी केलेल्या तपश्चर्येवर अखेर पाणी पडते.

वरवर विरक्तीनें रहाणाऱ्या किती तरी विधवा, प्रौढ विधवा मनांतून अत्यंत असंतुष्ट आणि चिडलेल्या असतात. त्यांनी केलेल्या त्यागाची कोणी क्षिति बाळगीत नाही. कारण तो त्याग त्यांनी स्वतःच्याच अब्रूसाठी केलेला असतो. त्या त्यागाचा समाजाला प्रत्यक्षांत कांहीच उपयोग होत नाही. त्यामुळें जन्मभर एकलकोंडे राहूनहि त्याची जाणीव ठेविली जात नाहीं. जे कोणी आस्था दाखवितात त्यात कधी धोक्याची भीति असते; तर ज्यांची आस्था प्रामाणिकपणाची असते त्यांची तेवढीच आस्था त्यांना पुरत नाही. त्यांच्या इच्छेप्रमाणे त्या अपेक्षा ठेवूं शकत नाहींत. आणि अपेक्षा ठेवणेच अशक्य असल्यानें त्या पुऱ्या होण्याचीहि शक्यता अर्थातच नसते. पण असे असलें तरी अपेक्षाच कमी करण्याचें मानसिक सामर्थ्य बहुतेकांच्या ठिकाणी नसतें. स्त्रीपुरुषाच्या जीवनाला एकमेकाच्या साहचर्यानें, आधाराने जी परिपूर्णता येत असते, किंबहुना निम्में जीवन याच साहचर्याने निसर्गतःच व्यापिलेले असते, तें अंशमात्रहि त्यांच्या वाट्याला येत नाही, त्यामुळें त्यांचा आत्मा नेहमी असंतुष्ट असतो.

ज्या घरात विधवा राहते त्या घरांत तिची सत्ता नसते. सत्ता नसते म्हणून हें आपलें घर आहे असा आपलेपणा, असा आधार, विश्वास, तिच्या मनाला कधींच वाटत नाही. जेथें तिची गरज अधिक तें तिच्या रहाण्याचें ठिकाण. आणि त्या प्रत्येक बदलत्या ठिकाणाला तिला आपलें घर समजून रहाण्याचा प्रसंग येतो. हें कसें शक्य आहे ? माणसाला पोटभर अन्न मिळालें नाहीं तर तो अर्धपोटी राहून जगतो. कसे तरी समाधान मानून घेण्याचा प्रयत्न करतो. पण अजिबात उपाशी पोटीं राहून संतुष्ट असल्याचा आव आणणें, विरक्तीचें

नाटक करणे हे एक भयंकर दिव्य आहे. ते आजच्या काळांत, धार्मिक संस्काराची बंधनें शिथिल झालेलीं असतांना, संस्कारांवरची श्रद्धा उडत चालली असताना, असलीं दिव्यें यापुढें होणे अशक्यच आहे.

शिवाय वयाच्या चाळीसाव्या वर्षीहि कित्येक विधवा स्त्रियांची अशी तक्रार असते कीं, त्या कितीहि शुचिर्भूतपणे रहात असल्या तरी त्यांच्या वागण्यावर लोकाची बारीक दृष्टि असते. आपला जीव मारून त्या रहात असतात; आणि तरीहि त्याच्या आचरणाविषयी लोक खात्री बाळगतीलच हा विश्वास नाहीच. वाघ म्हटले तरी खातो, वाघोबा म्हटलें तरी खातोच. मग वाघ्याच कां न म्हणावें? घरातील पुरुषांशी किंवा शेजारच्या माणसाशीं विवाहित स्त्रीनें बोललेलें कोणाला फारसे आक्षेपार्ह वाटत नाही. पण विधवा स्त्रीनें असें बोलणे संशयाला कारण होतें. यांत विधवा स्त्रीसंबंधाने जनतेची काक दृष्टि असते असे मानलें तरी तिलाहि इतर चार विवाहित स्त्रियाप्रमाणेंच संरक्षणाचें जीवन हवे आहे हा हेतु उघड दिसतो. माळावरच्या मातीप्रमाणें कोणीहि तुडवावे ही गोष्ट तिला सहन होत नाही. विवाहित स्त्रीसारखें मानाचें निर्धास्त जिणें तिला हवें असते. आणि तिच्या अंतर्मनाची खरी इच्छा हीच असते हे अगदी उघड सत्य आहे. मग ती तोंडानें दुसरें कांहींहि म्हणो.

वयाच्या चाळीसाव्या वर्षीहि स्त्रीच्या या भावना असतात यांत खरोखरी नवल कांहींच नाहीं. चाळीस वर्षानंतर स्त्रीचें मन संसारांतून विरक्त होते ही आपल्या मनाची खोटी समजूत आहे. संसाराचा अनुभव घेतल्याने त्या-बद्दलची तिची उत्सुकता कमी होईल हें खरे. पुरुषांचेसुद्धा असेच होतें. पण तरीहि वयाच्या चाळीसाव्या वर्षी त्याला सांसारिक गोष्टीचें व स्त्रीसहवासाचे आकर्षण असतेंच. स्त्रीचेहि असेंच आहे. पुरुषांप्रमाणे त्या धडाकून लग्नें करीत नाहींत याचें कारण स्त्रियांचे संस्कार पुरुषांहून निराळे असतात हें आहे. पण त्यांच्या अंतरांत त्याना पुरुषाचें साहचर्य हवें असतें. उलट वय वाढत जाते तशी शृंगारिक वासनांपेक्षांहि खात्रीच्या आधाराची तिला जास्त गरज वाटूं लागते. स्त्रीपुरुषांचें जीवन एकमेकांच्या साहचर्याशिवाय पूर्ण होत नाही या नियमाला वयाच्या चाळीसाव्या वर्षीहि स्त्री अपवाद होऊं शकत नाहीं.

समाजांत बालविधवा फसतात आणि प्रौढ विधवा फसत नाहींत असा समज करून घेणें वेडेपणाचें आहे. प्रौढ विधवाहि पुरुषसहवासाची भुकेली असते. बालविधवा आणि प्रौढ विधवा यांच्या फसण्याच्या उदाहरणांत जो फरक दिसतो त्याचें कारण बालविधवा या अजिबात अननुभवी असतात त्यामुळें औत्सुक्य, उतावळेपणा यांचें प्रमाण त्यांच्यात जास्त असतें. म्हणून त्या संयम राखूं शकत नाहींत; आणि प्रौढ विधवा अनुभवी असल्यानें संमयानें वागूं शकतात. पण तरीहि या वासनाचे नियमन होतेच असे नाही. आठ आठ मुलें झालेल्या विधवांनासुद्धां दिरानें किंवा आणखी एकाद्यानें फसविल्याची उदाहरणें समाजांत आहेत. आठ-आठ मुलें झालेल्या विधवेनें आपली जबाबदारी न ओळखता आडमार्गाने जावे ही गोष्ट समर्थनीय खासच नाही. पण इतकीं वर्षे संसार केल्यानंतरहि स्त्रीचे मन संसारांत, शृंगारांत किती गुरफटलेलें आहे हें सत्य या विषयाचा विचार करतांना दृष्टीआड करून चालणार नाहीं.

हें सत्य जर उघड्या डोळ्यानी पाहिले तर असे लक्षात येईल कीं, आजच्या पुनर्विवाहाचा विचार केवळ बालविधवेच्या दृष्टिकोनातून करून भागण्यासारखें नाही. समाजांतील चाळीस-चाळीस, पन्नास-पन्नास वर्षांचे पुढारलेले स्त्रीपुरुष विवाहबद्ध होतांना आपणांस दिसत आहेत. यावरून ही गोष्ट अगदीं उघड आहे की प्रौढ वयांतहि पुरुषसहवासाचे आकर्षण ही नैसर्गिक गोष्ट आहे. मग त्यात शारीरिक वासना आणि मानसिक प्रेमाचें समाधान यांचें प्रमाण कमीअधिक कसेंहि असो. याबाबतीत स्त्रियांवर बंधनें घालून त्यानी आपलें जीवन तसेंच कसे तरी रेटीत न्यावे असे म्हटले तरी आणखी कांही दिवसानी असा काळ येईल की, आजच्यापेक्षांहि धार्मिक संस्काराचीं बंधनें अधिक ढिली होतील. यापुढील स्त्रिया शिकलेल्याच असणार आहेत, निदान लिहावाचायला तरी शिकलेल्या असणारच असें गृहीत धरले पाहिजे. आणि शिक्षण जो जो वाढेल तो तो विचाराना न पटणाऱ्या सर्वच पारमार्थिक कल्पनाची पकड मनावर बसणें, किंवा शास्त्रांत सांगितलें म्हणून डोळे मिटून अंधश्रद्धेनें वागणें, या गोष्टी अर्थातच कमी होणार आहेत. या एकदा कमी झाल्या म्हणजे स्त्रीपुरुष-सहवासाचें

आकर्षणहि जास्त वाढेल. नाहीं तरी स्त्रीपुरुषसंबंधांवर जी बंधनें घातलेलीं आहेत त्यांचा बहुतेक भर धार्मिक श्रद्धेवरच होता.

समाजाची घडी व्यवस्थित बसावी यासाठीं धार्मिक बंधनें स्मृतिकारांनीं घातलीं हें खरें. पण त्या बधनांचे स्वरूप समाजव्यवस्था असे न दिसतां, पारलौकिक कल्याण, मोक्ष असेच सामान्य जनतेच्या मनावर ठसून राहिलें. याचाच पगडा सामान्य जनतेच्या मनावर बसल्याने समाजव्यवस्थेसाठी हीं बंधनें आहेत हे बहुतेकांना समजलेच नाही; त्यामुळे आपल्या सुरक्षिततेसाठी बंधने आहेत, आपल्या सौख्यासाठी हे नियम आहेत असे न वाटतां, या नियमांच्यासाठी आम्ही आहोत, आणि आमचे कांही झाले तरी बेहेत्तर, ह्या शास्त्रवचनांप्रमाणेंच आम्ही वागणार, याच मार्गाने जाणे भाग आहे, असा विपरीत परिणाम लोकांच्या मनावर झाला. असलें हें अंधश्रद्धेचें अज्ञानच लोकात फैलावले, म्हणून श्रद्धेच्या पोटीं घातलेल्या बंधनांचें आजवर पालन झाले.

पण आतां तसें होणार नाही. धार्मिक बंधने हीसुद्धां मोक्षावर दृष्टि न ठेवितां, समाजनियंत्रणाचा विचार करून ठरविली गेली होती हे लक्षांत घेतलें पाहिजे. त्यावेळच्या अज्ञ जनतेला हा खोल विचार त्यावेळच्या समाजधुरीणानी न सांगतां पारमार्थिक कल्याण आणि मोक्ष इत्यादि श्रद्धेच्या गोष्टींनी त्या त्या नियमांची महति पटविली. पण समाजनियंत्रणाचें कार्य श्रद्धेपेक्षां विचारांवरच अवलंबून ठेविलें पाहिजे. ते तसे पूर्वीच्या स्मृतिकारांनीं ठेविलें नाही म्हणून नवीन विचार ग्रहण करण्याची ताकद आमच्या अंधश्रद्धाळु मनांत उत्पन्न होत नाही. आम्ही सुधारणापराङ्मुख राहिलो, पुरोगामी विचार आम्हांला झेपेनासे झाले, एवढ्यासाठी पारमार्थिक कल्याणा-व्यतिरिक्त, प्रत्यक्ष घडत असलेल्या गोष्टींचाच विचार करण्याची संवय बहु-जनसमाजाला समाजसुधारकांनी लाविणें जरूर आहे.

मुलें असलेल्या विधवा स्त्रीनें लग्नाच्या भानगडीत पडतां कामा नये असें अनेकांना वाटतें. पण म्हातारपणींहि स्त्रीला पतिसहवासाचें केवढे आकर्षण असतें, त्याच्या आधारावर जगण्याची केवढी जरूरी असते, हे खरोखरी पाहिले तर त्यांनी तरुण अथवा प्रौढ विधवा स्त्रियांसंबंधी इतकें असहिष्णुतेनें बोलावें याचें सखेदाश्चर्य वाटतें. कारण स्वतःपुरत्या सुधारणा करणे ज्यांना

मानवतें, त्यांनी विधवांच्या बाबतींत मात्र जुन्या शास्त्रवचनांकडे धांव घ्यावी हें किती विपरीत आहे! पन्नास पन्नास वर्षे वयाला झाली, दहा-बारा मुलांचा पसारा निर्माण झाला, तरीहि ज्यांना एकमेकांपासून दूर रहाणें अवघड वाटतें, एकमेकांशिवाय चैन पडत नाहीं, त्यांनी मोठ्या तोंडानें विधवा स्त्रीला मुलें झालीं म्हणून विरक्तीचा उपदेश करावा हे धडधडीत ढोंगीपणाचे आहे. नवरा जीवंत असला म्हणजेच पतिसहवासाच्या इच्छा स्त्रीच्या मनांत म्हातारपणींहि असतात, आणि तो जीवंत नसला तर मात्र तरुणपणींहि त्या नष्ट होतात असें समजणे, किंवा अशी अपेक्षा करणे ही त्या विधवा स्त्रीची, अपेक्षा करणारांची आणि समाजाची निव्वळ फसवणूक आहे.

वयोवृद्ध स्त्रिया किंवा पुरुष एकत्र जमून जेव्हां पतिपत्नी प्रेमाच्या गोष्टी एकमेकांशीं बोलतात तेव्हां ती आपले म्हातारपण विसरून पुन्हां तरुण झालेली आपणांस दिसून येतील. असे असतांनाहि वयोवृद्ध माणसे जेव्हां, विधवा स्त्रीने लग्नाच्या मोहांत पडूं नये असे विरक्तीचा आव आणून सांगतात, तेव्हा सर्व उपभोग घेत असूनहि आपण आतां विरक्त आहोत असा खोटा आव आणण्याचा त्यांचा प्रयत्न असतो, आणि आमच्या सारखेच तिनेहि त्यागानें, विरक्तीनें राहावे असा अर्थ त्यांत अभिप्रेत असतो. ती जर खरोखरीच त्यांच्यासारखी विरक्त राहिली तर त्यांना चालेल काय? उपभोग घेत असूनहि ही माणसे विरक्तीचा दिमाख मिरवूं शकतात. पण हें ढोंग आहे. हा स्वार्थीपणा आहे. ते सुखी असतात म्हणून दुर्दैवी स्त्रियाच्या संबंधीं अशी निष्ठुर भावना दाखविण्यास त्यांना दिक्कत वाटत नाही. मनुष्यस्वभावाला दुर्दैवी जीवांना कोरडी सहानुभूति दाखविणें आवडतें. कारण त्यांत त्यांना मोटेपणा मिळत असतो. पण कोणी आपल्या परिस्थितींत सुधारणा करून घेऊन आनंदी झाले तर ते मात्र त्यांस मानवत नाहीं. पण ही संकुचितवृत्ति कोणी कितीहि दाखविली तरी म्हातारपणींहि स्त्रीपुरुषांना एकमेकाच्या सहवासाची—मग तें समाधान शारीरिक, मानसिक कसेंहि असो—ओढ असते, ही गोष्ट विधवा स्त्रियांना विरोध करणाऱ्या वयोवृद्ध माणसांच्या उदाहरणांवरूनच सिद्ध होण्याजोगी आहे.

हें मान्य केल्यानंतर प्रौढ विधवा स्त्रियांच्या दृष्टीनेहि पुनर्विवाहाचा

विचार करणें जरूर आहे हे ओघानेंच आलें. वाटल्यास शरीरशास्त्रज्ञ व मानसशास्त्रज्ञ या दोघांनीं, स्त्रीपुरुषांनी विवाह करणें कोणत्या वयोमर्यादेपर्यंत योग्य आहे हे ठरवून द्यावें. हा त्यांचाच अधिकार आहे. पण ती वयो-मर्यादा कांहीहि ठरली तरी इथून पुढे स्त्रीचा पुनर्विवाह ही गोष्ट जेवढी आवश्यक ठरेल तेवढीच ती विचारार्हहि होऊन बसेल. कारण आता लग्नें अगदीं लहानपणीं होत नाहीत. लग्नांत मुलगी मोटी असते, आणि जिच्यावर वैधव्याचा प्रसंग येतो तिला एक दोन मुलेंहि झालेली असतात.

मुले नसलेल्या विधवेशीं लग्न करणें आणि मुलें असलेल्या विधवा स्त्रीशीं लग्न करणे यात फरक आहे. मुले असलेल्या विधवेशी लग्न करण्यास पुरुष तयार नसतात. कारण, सावत्र मुले आहेत हे सांगतांना स्त्रीला नैतिकदृष्ट्या कमीपणाचें वाटत नाही, पण पुरुषाला आजपर्यंत तसा प्रसंग न आल्यानें कमीपणाचें वाटतें. शिवाय पुरुषाला जरी दोन बायकांची मुलें असली तरी ती त्याचींच असल्यानें त्याच्यावरच अवलंबून असतात. स्त्रीचें मात्र तसें नसतें.

एक तर पुनर्विवाह करताना तिला आपलीं मुलें पहिल्या घरींच सोडून दिलीं पाहिजेत, किंवा पुनर्विवाहित पतीच्या घरीं नेलीं पाहिजेत. मुलें पहिल्या घरीं सोडून देणें, निदान लहानपणीं सोडून देणें हें मातृहृदयाला मानवण्या-सारखें, सहन होण्यासारखे नाही. मुलांच्या दृष्टीनेंहि हें योग्य नाहीं. आणि स्त्रीचें वय विशेष प्रौढ नसल्यानें पुनर्विवाह तर करावयाची जरूरी असते. बरें, पुनर्विवाह केला तरी तिची मुलें सांभाळण्याची जबाबदारी पुरुष मान्य करीलच हें फारसे संभवत नाही. कारण जबाबदारी घेण्यास तो कशाला बाधील राहातो आहे ? व अशी जबाबदारी घेतलीच पाहिजे असें तरी पुरुषांना स्त्रियांनी म्हणणें कसे सयुक्तिक आहे ?

शिवाय सर्वसाधारण समाज द्रव्यानें मध्यम स्थितीतला, बहुतेक गरीब असाच आहे. तेव्हां आर्थिक अडचणींत पुरुष पुनर्विवाहास तयार झाला तरी तिच्या पहिल्या घरची मुलें सांभाळण्याची आर्थिक जबाबदारी तो पत्करणें अशक्यच आहे. त्यानें तशी ती न घ्यावी हेंहि व्यवहाराच्या दृष्टीनें एकापरी दोघांनाहि सुखाचेंच आहे. आर्थिक जबाबदारी त्यानें घेतली म्हणजे त्या मुलांवर व मुलांच्या आईवर नाहीं म्हटलें तरी दडपण येणारच.

कारण तीं मुलें तिचीं असलीं तरी त्याचीं नसतात. एवढ्यासाठीं मुलें असलेल्या विधवेनें प्रथम आर्थिकदृष्टया स्वावलंबी असणें अत्यंत जरूर आहे.

कित्येकांना वाटतें स्त्रीच्या आर्थिक स्वावलंबनानें तिचे सगळे प्रश्न सुटणार आहेत काय ? पण तें स्वावलंबन नसेल तर मात्र प्रश्न अडून राहतात ही अगदीं अनुभवास येत असलेली गोष्ट आहे. लो. टिळक म्हणत "घोडा अडला कशानें ? पाने कुजली कशानें ? आणि भाकरी जळली कशानें ?" याला एक उत्तर 'न फिरविण्याने' हे आहे." तसें स्त्रियांच्या प्रश्नांचें आहे. त्यांचें गाडें पुढे कां जात नाहीं ? याचें कारण "आर्थिक परावलंबन" हें आहे. विधवा आपल्या मुलांची जबाबदारी स्वतः उचलूं शकणार असेल तरच तिच्याशी लग्न करण्यास कोणी तयार होईल. किंवा तिच्या मृत नवऱ्याची जी संपत्ति असेल ती मुलांच्या प्रीत्यर्थ खर्च करण्यास तिला मिळाली पाहिजे. तिनें दुसरें लग्न केल्यामुळे पहिल्या नवऱ्याच्या इस्टेटीवर तिचा काडीमात्र हक्क उरत नाहीं हें बरोबर आहे. पण तिनें दुसरे लग्न केलें तरी नवऱ्याच्या पाठीमागें, तिच्या मुलांची सर्वांत जवळची, जिव्हाळ्याची खरी पालक तीच आहे.

म्हणून मुलें वयांत येईपर्यंत कायद्यानें ती तिच्याच स्वाधीन असावयास पाहिजेत. तिनें लग्न केलें तरी तिच्या मुलांचे पालकत्व, बाप हयात नसल्यामुळें तिच्याकडेच आले पाहिजे. बापानंतर मुलांच्या जिव्हाळ्याची आणि प्रामाणिक पालक खरोखरी आईच होऊं शकेल. तिच्यावर विश्वास न टाकतां मुलें दुसऱ्या कोणाच्या तरी स्वाधीन करणे हें सर्वांच्या दृष्टीनें चुकीचें आणि धोक्याचें आहे. आईने लग्न केले म्हणून, मुलांच्यावरचें तिचे प्रेम कमी झाले, किंवा मुलांची जबाबदारी तिला नको आहे असें समजण्याचें कारण नाही. तसेंच जर समजावयाचें असेल, आईच्या प्रेमावरहि विश्वास ठेवावयाचा नसेल तर इतरांच्या प्रेमाचा निर्वाळा तरी कसा द्यावा ? पुरुष जेव्हां पहिल्या पत्नीचीं मुलें असतांना दुसरें लग्न करतो तेव्हां त्याचें आपल्या मुलांवर प्रेम नसते असें कोणी म्हटलें आहे काय ? किंवा असें कोणी म्हणूं शकेल काय ?

स्त्रीसुद्धां पुनर्विवाहास मुलें असतांनाहि तयार होते तेव्हां तिचें आपल्या मुलांवर प्रेम नसतें म्हणून ती तयार होते असें नाहीं. पण तिला हवा

असलेला आधार मुलांच्याकडून मिळणे शक्य नसतें. उलट तीच मुलांचा आधार असते. पण मुलांनाहि तिच्या आधाराची कांहीं एका ठरावीक वयापर्यंतच जरूरी असते. नंतर त्यांच्या सौख्याचे विषय निराळे होतात. आणि ज्या विधवेनें आपल्या मुलांवर विसंबून त्यांच्यासाठी एकटेपणाचें जिणें काढलेलें असतें ती मात्र अखेरपर्यंत एकटीच रहाते. मुलाच्या सहवासाचें सौख्य आणि पतिसहवासाचें सौख्य यांत फार मोठें अंतर आहे.

पति आणि पत्नी याच्या जीवनाचे प्रवाह समुद्र आणि नदीच्या प्रवाहासारखे एकांत एक मिसळून वहात असतात. त्यांच्या जीवनाचे मार्ग अभिन्न असतात. एकमेकाना मरेपर्यंत, सतत साथ देण्यासाठीच ती जवळ आलेली असतात. त्यामुळे त्यानीं एकमेकांसाठी कांही करणें किंवा करून घेणें हें अधिक हक्काचे, अधिक जिव्हाळ्याचें, प्रेमाचें आणि निःसंकोच असतें. पतिपत्नीचें नातें हें बरोबरीचें असते. त्यांत कोणाचे कोणावर उपकार नसतात, म्हणून ती जाणीवहि ठेवावी लागत नाहीं.

पण मुलांचे व आईचे नातें कितीहि म्हटले तरी असं अभिन्न नसतें. मुलाच्या सौख्याचे विषय निराळे होतात यात वावगें कांहीं नाही. शिवाय मुलानें आईशी प्रेमानें वागणें, तिला आर्थिक मदत करणें हें मुलाचे कर्तव्य आहे, आणि आईचा तो हक्क आहे हे सारे खरे. तरी नवरा नसतांना आईला या सर्व गोष्टींचें ओझेंच होत असतें. नाही म्हटले तरी तिला उपकाराच्या जाणीवेनेंच वागावें लागतें. ती न वागेल तर मुलांचें हें प्रेम कायम टिकेलच याची शाश्वति खरोखरीच नसते.

आई व मुलगा याच्यांत एका पिढीचें अंतर असल्याने आपल्या सुखदुःखाचे उमाळे ती त्याला बोलून दाखवूं शकणार नाहीं. प्रथम लहान असतात म्हणून व मोठेपणीं संकोच उत्पन्न होतो म्हणून. तेव्हां अशा कारणानें पतिसौख्य, पतिसहवास, पतीचा आधार इत्यादि गोष्टींची उणीव मुलांकडून भरून निघणें अशक्यच असतें. हीं दोन्हीं नातींच तुलना करतां येण्यासारखीं नाहीत. म्हणून मुलांकडे बघून विधवांनीं आपलें आयुष्य कंठावें असें म्हणणें चूक आहे. एक दोन मुलें होऊन पतिनिधनाचा प्रसंग यावा असें किती तरी स्त्रियांचें होतें. आणि या प्रसंगानंतर त्यांचें आयुष्य रुक्ष उदास आणि एकलकोंडें होत जातें. अशा मुलें असलेल्या विधवा स्त्रियांचाच मुख्य प्रश्न

यापुढें उपस्थित होणार आहे. कांहीं प्रमाणांत तो आजहि समाजापुढें आलेलाच आहे. त्याचाच विचार समाजानें जास्त उदारपणें करणें जरूर आहे.

पुनर्विवाह झाल्यानंतर आपली मुले स्त्री पुनर्विवाहित पतीच्या घरीं घेऊन गेली तर त्या मुलाचे हाल होतील असें कांहीं लोक म्हणतात. पण मुलांचा आर्थिक भार पुनर्विवाहित पतीवर राहिलाच नाही म्हणजे हा प्रश्न सुटेल. अशा तऱ्हेचा कायदाच झाला पाहिजे, आणि त्यासाठीं मुलांच्या मृत वडिलांची संपत्ति मुलें वयांत येईपर्यंत त्यांच्या सर्व तऱ्हेच्या खर्चास पुरण्याइतकी असली पाहिजे. किंवा मुलांची आई त्यांच्या खर्चापुरते पैसे मिळविण्याइतपत स्वावलंबी तरी असलीच पाहिजे. असें असल्याशिवाय त्या स्त्रीस पुनर्विवाहास कायद्यानें परवागी मिळतां कामा नये. अन्यथा, एकादा पुरुष जर तिच्या मुलांची आर्थिक जबाबदारी घेण्यास तयार असेल व आर्थिक दृष्ट्या पूर्णपणें समर्थ असेल तर मग कागदोपत्रीं तसा करार होऊन मग त्यांना पुनर्विवाहाची कायद्यानें संमति मिळावी व हेंच सर्व दृष्टीनें हिताचें आहे.

ही आर्थिक व्यवस्था एकदां चोख झाली म्हणजे मग मुलांचे हाल होण्याचा प्रश्न उद्भवण्याचें फारसें कारण पडणार नाहीं. मुलांचे खाणेंपिणें, कपडालत्ता, आजार—दुखणें, शिक्षण या सर्व गोष्टीवर तिची स्वतःचीच देखरेख रहाणार असल्यानें—आणि या गोष्टी पुरुषांपेक्षां स्त्रीच्याच हातांत असल्यानें—ती स्वतःच आपल्या मुलांचे हाल करील ही गोष्ट विश्वसनीय वाटत नाही. इतर कोणाहिपेक्षां प्रत्यक्ष आईच मुलांचे संगोपन जिव्हाळ्याने, प्रेमाने आणि प्रामाणिकपणानें करील असा विश्वास धरणें अधिक सयुक्तिक आहे. शिवाय पुरुष जेव्हा दुसरें लग्न करतो तेव्हां प्रथम पत्नीचीं मुलें जर तिच्या स्वाधीन करण्याइतपत विश्वास तिच्यावर टाकतो व त्याबद्दल कोणीहि आक्षेप घेत नाही, तर तिच्याच मुलाचा विश्वास तिच्यावर टाकणें यांत अयोग्य, अनैसर्गिक असें काहीच नाही. म्हणून पतीच्या मरणानंतर मुलांचें पालकत्व तिनें दुसरें लग्न केलें, तरीहि इतर कोणाकडेहि न जातां तिच्याकडेच कायद्यानें आलें पाहिजे. तिनें स्वखुशीनें व स्वतःच्या खात्रीनें मुलें आपल्या नातेवाईकांकडे ठेवलीं, तर ती तिची जबाबदारी आहे. तिच्या विश्वासाचा तो प्रश्न आहे. पण होता होईतों आई, आपलें मूल जवळ ठेवणें शक्य असतांना दुसरीकडे कधींहि ठेवणार नाहीं.

मात्र विशेष कारणानें किंवा स्वतःच्या आईकडे अगर प्रथम नवऱ्याच्या आईजवळ तिनें आपलीं मुलें ठेवून लग्न केलें व तीं मुलेंहि खुशीनें आजोळीं किंवा स्वतःच्या घरीं राहिलीं तर त्यांत आईला नांवें ठेवण्याचें कारण नाहीं. कारण आईवडिल जिवंत असूनहि मुलांच्या शिक्षणासाठीं त्यांना बोर्डिंगांत किंवा इतरत्र ठेवतात. किंवा आईवडिल नोकरीधंद्याच्या निमित्त्यानें परदेशांत राहून मुलें स्वदेशांत इतर नातेवाईकांजवळ ठेवतात तेव्हां त्यांचें आपल्या मुलांवर प्रेम नसतें काय? पण त्यांना कोणी नांवे ठेवीत नाहीं. कारण आईवडिलांनीं चांगल्या परिस्थितींत ही गोष्ट केलेली असते. मग प्रसंगीं विधवेनें असें केलें तर तिच्यावर कठोर हृदयाचा आरोप कां?

आईनें पुनर्विवाह केला म्हणजे कांही मुलांचीं आडनांवे बदलत नाहींत. त्यांनीं आपल्या बापाचें नांव लावावें. त्याच्याच संपत्तीवर शिक्षण घ्यावें. व पुढें त्याच्या संपत्तीचे मालक व्हावें. मुलें लहान असल्याने त्यांना कांही काळ आईबरोबर दुसऱ्या घरी रहावें लागेल हें खरें. पण त्याला इलाज नाहीं. आईनें जन्मभर एकलकोंडे राहून अखेर मुलांवरच विसंबून राहण्यापेक्षां मुलांचें सर्व दृष्टीनें व्यवस्थित होत असतांना त्यांना आपले लहानपण दुसऱ्या घरीं घालवावें लागणें यांत फारसें वावगें नाही. मुलगा वयांत आल्यानंतर, त्याचें शिक्षण झाल्यानंतर त्यानें आपला संसार थाटून वेगळें रहावें म्हणजे झालें. नाही तर तीन वर्षांत दोन मुलें झालेल्या विधवा स्त्रीनें आपल्या आयुष्याची कड गांठावी कशी? ती उद्यां फसली, तिचें पाऊल वांकडें पडलें, तिला आडमार्गानें जाण्याची बुद्धी झाली तर या साऱ्या अनर्थाला जबाबदार कोण?

अशीं उदाहरणें समाजांत घडत आहेत. दोन-दोन मुलें झालेल्या स्त्रियाहि या मोहांत पडत आहेत. एकदां आपल्या माणसांना तोंड दाखविण्याची चोरी झाली म्हणजे याच स्त्रिया परधर्माच्या अमिषांना बळी पडतात. किंवा चोरून मारून धंदा करण्याच्या दुष्ट मार्गालाहि लागतात. अशा गोष्टी होणें हें समाजाच्या, मुलांच्या व त्या व्यक्तीच्या दृष्टीनेंहि अत्यंत अनिष्ट, अनहिताचें आहे. असें होतां कामा नये व एवढ्यासाठीं मुलें असलेल्या विधवांचाहि समाजानें व कायद्यानेंहि सहानुभूतीनें विचार करणें जरूर आहे. आजच याची जरूरी उत्पन्न झाली आहे. उद्यां ती जास्तच होणार आहे.

# घटस्फोट : : ८

स्त्रियांच्या उन्नत्तीच्या दृष्टीने अलिकडील काळांत घटस्फोटाचे बिल पास होऊन त्याचें कायद्यांत रूपांतर झालेलें आहे. स्त्रीपुरुषांच्या जन्मगांठी ब्रह्मदेव लग्नाआधीच बांधून ठेवीत असतो आणि आपण मंत्राक्षतांनी चारचौघांसमक्ष त्या गांठी जाहीर करून टाकीत असतो, अशी आजपर्यंत समजूत होती. यामुळें विवाहबद्ध झालेल्या जोडप्यास कोणत्याहि परिस्थितीत कायद्याने घटस्फोट मिळत नसे. याचा स्त्रीमनावर परंपरागत असा परिणाम होत आला कीं कोणताहि बावळट मूर्ख नवरा आपला देव आहे, अशी भावना तिच्या मनांत निर्माण झाली. समाजांतील पुरुषांचीहि हीच भावना—ती इतकी खोल रुजलेली आहे की अजूनहि नालायक नवऱ्यास देव माना असें सांगणारे स्त्रीपुरुष कितीतरी आहेत ! पण जुनी पिढी नाहीशी होईल तेव्हा असें सांगणारे स्त्रीपुरुष फार कमी निघतील असें अनुमान काढण्यास हरकत नाही.

तेव्हां आजपर्यंत हिंदु कायद्यांत घटस्फोटास मान्यता नसल्याने ज्या स्त्रियांची कुचंबणा झाली किंवा होत आहे त्यांना सुटकेचा बराचसा मार्ग मोकळा झाला आहे यांत शंका नाहीं. डॉ. देशमुखांनी मांडलेलें बिल व त्या बिलावर विधिमंडळानें केलेला हा कायदा समग्र वाचून पाहिला तर असें दिसून येईल कीं स्त्रीपुरुषाच्या वैवाहिक जीवनासबंधी त्यांनी अत्यत सहानुभूतीने,समजूतदारपणानें व त्यांतल्यात्यांत समतोल बुद्धीनें पाहिलें आहे. आपले वैवाहिक जिणे ज्यांना असह्य झाले, त्यांनीं त्यांतून आपली सोडवणूक करून घ्यावी अशी सोय या कायद्यांत झालेली आहे. या कायद्यानें घटस्फोटासाठीं स्त्रीपुरुषाच्या झुंडीच्या झंडी कोर्टाकडे धांवत जातील अशी ज्यांची समजूत असेल त्यांना ही भीति बाळगण्याचें खरोखर कारण नाही. घटस्फोट इतका सुलभ असावा, वाटेल त्या लहरीखातर तो मिळावा, स्त्रीपुरुषाच्या

स्वैराचारांस त्यानें उत्तेजन मिळावे असा या कायद्याचा मुळींच हेतु नाहीं. ज्यांच्यावर रूढीनें अन्याय केला आणि सुखाचे दरवाजे देवाच्या नांवावर ज्यांना कायमचे बंद झाले, त्या दुर्दैवी जीवांना या कायद्याने आशेचा किरण दाखविला आहे. कायद्यामुळें घटस्फोट जास्तींत जास्त व्हावेत असा कायदे करणारांचा दृष्टिकोन नसून, जरूर त्या योग्य व न्याय्य ठिकाणी स्त्रीपुरुषांची कुचंबणा होऊं नये एवढाच त्यांचा हेतु दिसतो. घटस्फोटाच्या कायद्यानें स्त्रीजीवनांतील अंधार कमी करण्याचा जो प्रयत्न डॉ. देशमुख व विधिमंडळानें केला त्याबद्दल स्त्रीसमाजाने त्यांना पुनःपुन्हां धन्यवाद दिले पाहिजेत. त्यांच्याबद्दल जेवढी कृतज्ञता व्यक्त करावी तेवढी थोडीच आहे.

असो; खालील कारणांवरून घटस्फोट मिळावयाचा आहे—

( १ ) नपुंसकत्व; ( २ ) चार वर्षेपर्यंत टाकून देणें; ( ३ ) सात वर्षेपर्यंत नाहींसें होणे; ( ४ ) सात वर्षेपर्यंत असणारें वेड किंवा महारोग; (५) नवऱ्यानें दोन किंवा अधिक लग्नें केली असल्यास कोणत्याहि पत्नीस घटस्फोट घेतां येईल; ( ६ ) रखेली ठेवणे, ( ७ ) बायको जर दुसऱ्या कोणाची रखेली असेल, वेश्याव्यवसाय करीत असेल तर मात्र २० वर्षे संसार केलेल्या पतिपत्नीस २ व ६ कलमांखेरीज करून घटस्फोटाचा हक्क नाहीं.

'नवभारत' मासिकांत या कायद्यासंबंधी लिहितांना श्री. ना. गो. चापेकरांनीं, रखेली ठेवणे व व्याभिचार करणें यांतील अर्थभेद स्पष्ट केला आहे व असें दाखविलें आहे कीं नुसत्या व्याभिचारानें घटस्फोट मिळवितां येत नाहीं, दुसरी कोणी ठेवलेली बाई असल्यासच मिळतो. वास्तविक व्याभिचाराचे दुष्परिणाम व धोके जास्त! असें असतांना कायद्याला तो संमत आहे, असें दिसतें. श्री. ना. गो. चापेकरांचा हा आक्षेप रास्त वाटतो.

या कायद्यासंबंधीं लिहितांना श्री. ना. गो. चापेकर पुढें म्हणतात, 'पतिपत्नीपैकीं एकानें दुसऱ्यास सोडून दिलें असतां वीस वर्षांचा काळ होऊन गेल्यावरसुद्धां कोणालाहि घटस्फोटाचा दावा आणतां येतो एवढी घटस्फोटाची हौस विधिमंडळाला वाटतें हें आश्चर्य आहे." २ व ६ या कलमांनुसार त्यांत घटस्फोटाची जी सवलत ठेवली आहे ती श्री. ना. गो. चापेकरांना मान्य नाहीं. माझें म्हणणें थोडक्यांत असें कीं, ही सवलत आजच्या परि-

स्थितीला अपुरी आहे. वीस वर्षे प्रेमानें ज्यांनी संसार केला त्या पतिपत्नी-पैकी कोणी वेडें झाल्यास, महारोगी झाल्यास किंवा शरीरसौख्यास अपात्र झाल्यास कोणी कोणास सोडून देऊं नये हें पतिपत्नी–प्रेमाला खरोखरी साजेसेंच आहे. असें प्रेम पतिपत्नीमध्यें खरोखरीच असेल तर–पुष्कळ ठिकाणीं असतेंहि–समाजांतील किती तरी प्रश्न सोपे होतील; कित्येक प्रश्न नाहींसेच होतील; कित्येक कायद्याची जरूरीच पडणार नाहीं; आणि असें झाल्यानें समाजांतील व्यक्तींचें वैवाहिक जीवन अधिक सुखी होईल.

पण असें असतें काय? याचें उत्तर अस्ति अगर नास्ति—कोणत्याच पक्षीं देतां येणार नाही. म्हणूनच हौसेनें, उमेदीनें केलेले विवाह कधीं कधीं व्याधिसारखे होऊन बसतात. ज्यांनीं लग्नाचे वेळी “ धर्मेच अर्थेच कामेच नातिचरामि ” म्हणून हातांत हात घालून शपथ घेतली, त्यांनींच कांहीं अवधीनंतर घटस्फोटास तयार व्हावें हा एक भयंकर भेसूर विनोद आहे! ‘वदतो व्याघाता’चे हें एक सुंदर पण भयानक उदाहरण आहे. ज्यांचे संसार प्रेमानें झालेले असतील त्यांचे ठीकच आहे. नाहीतर कित्येकांचे संसार वीस वीस वर्षे झाले, पण कसे झाले ह्या प्रश्नाचा विचार करण्यासारखा असतो. कित्येक नवरा–बायकोच्या उदाहरणांवरून हें उघड उघड दिसण्यासारखें असतें कीं, त्यांचें एकमेकांवर प्रेम असण्याचा आणि त्यांना मुलें असण्याचा कांहींहि संबंध नसतो. तरीपण त्यांच्या संसारास वीस वर्षे होतात. अशा बदसूर जोडप्याना दूर राहाण्यास मिळेल किंवा शक्य झाल्यास दुसऱ्या विवाहाची संधि मिळेल तर हवी असते. पण वीस वर्षे संसार केला म्हणून दोन व सहा कलमांशिवाय इतर कलमान्वयें त्यांना घटस्फोटाची सवलत मिळूं नये हा त्या माणसांवर अन्याय आहे. नपुंसकत्व, वेड किंवा महारोग या कारणांस्तव तरी त्यांना घटस्फोट मिळणें जरूर आहे.

घटस्फोटाचे हे कायदे होण्यापूर्वी घटस्फोट घेण्यासारखी परिस्थिती समाजांत निर्माणच होणार नाहीं अशी काळजी घेणारे कायदे अगोदर पास व्हावयास पाहिजेत. आपलें नशीब सुधारण्याची संधी मिळणें जेवढें जरूर आहे त्याहिपेक्षां कोणाच्याहि वांट्यास दुर्दैवाचा भाग शक्य तितका येणारच नाहीं अशी व्यवस्था सुसंस्कृत समाजानें केली पाहिजे. अनुरूप वधुवरांची निवड होणें, त्यांच्या वयाला मर्यादा घालणें, तरुण मुली व म्हातारे पुरुष

यांच्या विवाहास कायद्याने बंदी घालणे, शिक्षणाचें बंधन सर्वत्र जारी करणे, वैद्यकीय तपासणी होणे, द्रव्यार्जनाची पात्रता कांही प्रमाणांत तरी स्त्रीची व मुख्यतः पुरुषाची असणे, गृहससार व बालसंगोपनाचा शिक्षणक्रम मुलीनें पुरा करणें, व वधूवर एकमेकांस संपूर्ण पसंत असल्याची खात्री करून घेणें वगैरे सुखी संसाराचे जे ठोकळ नियम ते सक्तीने अमलांत आणले गेले पाहिजेत. अशा पद्धतीने ज्यांचे विवाह झाले आणि ज्यांनी प्रेमाने वीस वर्षे संसार केला त्यांच्यावर हे बंधन घालणे अगदी वाजवी आहे. असे स्त्रीपुरुष, विशेषतः स्त्रिया 'वीस वर्षे आपलें पटलें पण आतां पटत नाही' असे म्हणून घटस्फोट मागतील हें शक्य वाटत नाही.

पण या बंधनास अजून अवकाश आहे. अनुरूप वधुवराची निवड सर्वत्र होतेच असें नाही. यापुढे होण्याची शक्यता आहे हे खरे. पण वीस वर्षे नको असलेल्या संसाराची कुचंबणा ज्यांनीं सहन केली त्या स्त्रीपुरुषांचें काय? संस्कारांच्या दडपणांनी ज्यांनी संसार केले व घटस्फोटासाठी मनाची तयारी करण्यात ज्यांची वर्षे खर्ची पडली, त्यांच्या लग्नाला वीस वर्षे झाली म्हणून त्यांस महारोग, नपुसकत्व किंवा वेडासारख्या कारणास्तवहि घटस्फोट मिळू नये हा जुल्म आहे. घटस्फोटाची गोष्ट नवीन आहे व कायद्यानें ठरविलेल्या कारणाकरतांहि तो घेण्याची ज्यांना मनाची तयारी करणे अवघड असते, अशांच्या दृष्टीनें पहातां वीस वर्षांची मर्यादा घालू नये. पुनर्विवाह कायद्याने संमत ठरून इतकी वर्षे झाली तरी कित्येक स्त्रिया लोकलज्जेमुळे दहा दहा वर्षें तशीच घालवितात व मग चाळीसाव्या वर्षीहि त्या लग्नास तयार होतात. आतां त्यांच्या या चाळीसाव्या वर्षीच्या लग्नास जर बंदी केली तर त्यांची अवस्था फार कठीण होईल. तेव्हां अनुरूप विवाहांची व्यवस्था अस्तित्वांत येईपर्यंत तरी ही वीस वर्षांची मर्यादा घालावयास नको होती.

परंतु त्यापूर्वीं पूर्वीपेक्षां आजच्या काळांत घटस्फोटाची आवश्यकता जास्त कां उत्पन्न झाली हा एक विचार करण्यासारखा प्रश्न आहे. पूर्वीच्या संसारांत सुख होतें; दुःख नव्हतें असें म्हणतां येत नाही. पण त्या दुःखाला वाचा नव्हती. आतां दुःख बोलकें झालें आहे. पण आजच्या संसारांतील दुःखाचीं कारणें पूर्वीच्या कारणांहून भिन्न आहेत. त्यांतील अनेक कारणांपैकीं महत्त्वाचे

एक कारण, एकमेकानी एकमेकासबधी ठेवलेल्या फाजील अपेक्षा; आणि दुसरें, समाजांतील स्त्री–पुरुषांची वाढती मैत्री. " आमचे विवाह " या लेखांत व्यवहाराबाहेर अपेक्षा ठेविल्या म्हणजे माणसाला दुःखी व्हावें लागतें हें मी सांगितलेंच आहे. आतां आजच्या आधुनिक समाजांत आधुनिक स्त्रीपुरुषांनीं सरमिसळ वागावें कीं नाही, वागावयाचें असल्यास त्याच्या मर्यादा कोणत्या हा महत्त्वाचा प्रश्न आहे. किंबहुना विवाहाचें सुखदुःख पुष्कळसें या गोष्टीवरच अवलंबून असतें. काळ किती सुधारला आणि माणसे कितीहि आधुनिक झाली तरी पतिपत्नींनी एकमेकाबद्दल एकनिष्ठपणाची अपेक्षा करणे ही अगदीं स्वाभाविक वृत्ति आहे. पण सुधारणेच्या गोंडस नांवाखालीं परस्त्रीपुरुष पुष्कळदा मर्यादेपेक्षां जास्त सहवासात येतात. आणि सहवासांत आल्यानंतर सहवासाचें रूपान्तर नको त्या गोष्टींत होऊं लागते. कित्येकदां स्त्रिया भाबडेपणानें, स्त्रीस्वातंत्र्याच्या खोट्या कल्पनांनीं भारून जाऊन पुरुषांशीं मैत्री करतात. पण पुरुषाची शिकारीवृत्ति आजच्या कालांतहि पूर्वींइतकीच जागृत आहे. काही सुजन सोडल्यास कोणत्याहि प्रसंगीं सर्वसामान्य पुरुष स्त्रीकडे बहुधा शिकारीवृत्तीनें " सावज " म्हणून पहाण्याचें कधींहि विसरत नाही. सुशिक्षित स्त्रीलाहि कधीं कधी याचा पत्ता नसतो, तर कधीं कधीं कळत असूनहि प्रतिकार करण्यास तिचा आधुनिक दुबळेपणा आडवा येतो. आणि यांतूनच मग गृहकलहाचे बीज जन्मास येतें. एकमेकांस अनुरूप असूनहि तिसऱ्या माणसाच्या मैत्रीच्या निमित्तानें बेबनावास सुरुवात होते. अशा या नाजुक बाबतीत पतिपत्नींनी आपल्या दोघांच्या सुखासाठी या अगांतुक तिसऱ्या माणसाची हकालपट्टी वेळींच केली तर सारे ठीक होते. नाहीं तर नसत्या गोंधळांत सांपडून घटस्फोटाच्या दारुण विपत्तींत निष्कारण पडावें लागते.

एवढ्यासाठीं स्त्रीपुरुषांनी—विशेषतः स्त्रियांनीं कितीहि सुधारणा केल्या तरी चालतील, कोणत्याहि क्षेत्रांत आपली बुद्धी चालविली तरी चालेल. पण स्त्रीपुरुषांतील योग्य त्या अंतराचें उल्लंघन मात्र कदापिहि करूं नये. आजच्या काळांत आणि इथून पुढें नोकरी व्यवसायाच्या निमित्तानें स्त्रीपुरुषांचा सहवास वाढता रहाणें अपरिहार्य आहे. तरी पण तितक्यास जितकें ठेवणें हा नियम पाळतां येण्यासारखा आहे. स्त्रियांना स्वातंत्र्य हवें असलें तरी ज्या

स्वातंत्र्यानें संसारावर निखारा ठेवण्याची पाळी येईल असल्या स्वातंत्र्याच्या खोट्या भुलभुलावणीत त्यांनी कधींहि फसूं नये. एवढेंच नव्हे तर आपल्या पतीचा संपूर्ण विश्वास संपादन करण्यासाठीं या बाबतींत कांटेकोर वागावें लागलें तरी तीं बंधनें अवश्य घालून घ्यावींत. फार तर पतीनेंहि हीं बंधनें पाळावींत असा आग्रह धरावा. पण एकमेकांनी एकमेकांचा विश्वास मात्र कधींहि गमावूं नये.

मार्चच्या "नवभारत" मासिकाच्या अंकांत "आधुनिक विवाह असुखावह होणें अपरिहार्य आहे काय?" या शीर्षकाखालीं प्रा. श्रीकृष्ण के. क्षीरसागर यांनी एक अत्यंत मार्मिक असा लेख लिहिला आहे. ज्यांनीं वाचला नसेल त्यानी, विशेषतः आजच्या तरुणतरुणींनीं, अवश्य वाचण्याजोगा आहे. संभ्रमांत पडलेल्या व्यक्तींना या लेखापासून पुष्कळच शिकता येण्यासारखें आहे. ते म्हणतात, "आजच्या काळांत स्त्री–पुरुष आधुनिकतेच्या खुळचट कल्पनांनीं हे 'Problems' निष्कारण वाढवितात असे आढळून येईल. आधुनिक स्त्रीची सवत दहांतील नऊ उदाहरणांत, तिनेच कौतुकाने घरांत आणलेली, 'Introduce' करून दिलेली एके काळची मैत्रीण असते असें आढळून येईल. नवऱ्याला न आवडणारा, स्त्रीचा स्नेही देखील बहुधा त्यानेच आधुनिकतेच्या प्रौढीने उत्तेजिलेला एके काळचा "स्नेही"च असतो. या बाबतींत स्त्रीने पुरुषावर आणि पुरुषाने स्त्रीवर नियंत्रण घालणे अनुदारपणाचें, भित्रेपणाचे आणि मागासलेपणाचे लक्षण समजण्यांत येते. "आपल्याला नाहीं त्याचे कांही वाटत"...इ. इ. म्हणणाऱ्या पतींच्या घरांतील प्रेमाचें आणि विश्वासाचें वातावरण नाहीसे होऊं लागले, तरी त्यावर उघड दिसणारा इलाज करणेंहि त्यास कमीपणाचे वाटते. आणि इकडे स्त्री तर मोहाच्या ओढीमुळें सारखी घसरत असते."

प्रीतिविवाह व्हावेत असें आपण म्हणतो; पण प्रीतिविवाह करणारावर प्रीति टिकविण्याची जबाबदारी असते हें ते विसरतात. विवाह कोणत्याहि पद्धतीनें केला तरी पतिपत्नीप्रेम टिकून रहावें, वाढावे, यासाठीं बंधनें पाळणें एकमेकांसाठीं त्याग करणे, तडजोडीने वागणें इत्यादि गोष्टी अगदीं अपरिहार्य आहेत. उलट प्रीतिविवाह करणारांच्यावर आपली प्रीति सांभाळण्याची जास्त जबाबदारी आहे. ही जबाबदारी जे ओळखून वागत नाहींत त्यांचा स्वतःचा

तर नाश होतोच; पण जबाबदार प्रेमविवाहित माणसांनाहि बेजबाबदारांच्या मालिकेत विनाकारणच जाऊन पडावे लागतें. असो.

तेव्हां विवाह कोणत्याहि पद्धतीनें झाला तरी आपली जबाबदारी ओळखून वागण्याचें त्यांनी सतत ध्यानांत ठेविलें पाहिजे. एकमेकांपासून व्यवहार्य अपेक्षा आणि एकमेकांबद्दलची निष्ठा, या दोन गोष्टी जर वधुवरें कसोशीनें सांभाळतील तर घटस्फोटाचे प्रसंग पुष्कळच कमी येतील.

शिवाय पतिपत्नींचें पटत नाहींसे झाल्यावर मानसशास्त्रीय दृष्ट्या, शारीरिकदृष्ट्या त्यांचे कां पटत नाही याचा शोध लाविला पाहिजे; व त्याप्रमाणें त्यावर उपाय झाले पाहिजेत. तडजोडीचा प्रयत्न शक्यतों केला पाहिजे. संसार ही तडजोड आहे. पाश्चात्य देशातहि घटस्फोट देण्यापूर्वी असे प्रयत्न होतात. विचार करण्यास अवधि देतात. आणि घटस्फोटानंतरहि सहा महिने विवाह करण्यास परवानगी देत नाहीत (आपल्या कायद्यांतहि तसेंच आहे). यामुळे कित्येक जोडप्यांचे पुन्हां सूत जमते. कित्येक जोडपी घटस्फोट घेऊनहि पुन्हा त्याच व्यक्तीशी विवाहबद्ध होतात. हे सारे पाहिल्यावर घटस्फोट घेण्यापूर्वी तडजोडीचेच प्रयत्न होणे किती जरूर आहे याची खात्री पटेल. या उपरहि ज्याचे पटत नाही त्या दुर्दैवी जीवांना घटस्फोटाशिवाय दुसरा उपाय उरत नाही. असो.

कलम २ मधील वर्णनाप्रमाणे चार वर्षे एखाद्याने एखाद्यास टाकले तर ज्या व्यक्तीला टाकले तिला फिर्याद करता येते हे बरोबर आहे. पण ज्यानी दुसरी व्यक्ती आपणास नको म्हणून टाकली, त्या टाकणाऱ्या व्यक्तीला, ती पुरुष अगर स्त्री असो—घटस्फोट मागता येतो की नाही याचा उलगडा होत नाही. नवऱ्याने बायकोस टाकले तर तिच्यावर अन्याय होतो म्हणून घटस्फोटाच्या मार्गानें तिने न्याय मिळविणे हे ठीक झाले. पण ज्याला ती स्त्री नको म्हणून त्यानें टाकली, ती त्यानें ‘ टाकली ’ म्हणून, नको असलेली बायको त्याच्या गळ्यांत घालणे हा त्याजवर अन्याय नव्हे काय? यामुळें त्याला घटस्फोट मिळणार नसेल तर द्विभार्याप्रतिबंधक कायद्यांत तो विनाकारण अडकून पडेल. अशा उदाहरणांत पतिपत्नी समजूतदार असतील तर ‘ आम्हीं एकमेकांस टाकले आहे ’ असें सांगून सुटका करून घेतील. पण यांपैकीं

एखाद्याच्या मनांत दुसऱ्याला अडकवून ठेवण्याचेंच आले, तर संबंध नसूनहि तें होतें असें सांगून त्याला दुसऱ्याचें नुकसान करतां येईल.

असें होतां कामा नये. एवढ्यासाठीं चार वर्षे टाकल्यानंतर घटस्फोट मिळण्याचें जें कलम आहे त्यांतच स्वभावभिन्नतेमुळें ज्यांचें पटत नाहीं त्यापैकीं कोणी एकानें दुसऱ्यास टाकून दिल्यासच चार वर्षानंतर त्यांना घटस्फोट मिळावयास हवा. या सबंध कायद्यांत हाच अपुरेपणा आहे की यांत फक्त शारीरिक व्याधींचाच विचार केला आहे. पण संसार केवळ शरीरसंबंधावर सुखी होत नाहीं. किंबहुना शरीरसंबंध रहाण्यासहि मानसिक आपलेपणाचा थोडासा तरी अंश असावा लागतो. या कायद्यांत मनानें विजोड असणाऱ्या पतिपत्नींचा कांहींच विचार करण्यांत आलेला नाही. महारोग, नपुंसकत्व, किंवा वेड इत्यादि कारणास्तव घटस्फोट जरूर मिळाला पाहिजे हें खरें. पण वरील बहुतेक सर्व कारणांपेक्षां मानसिक दृष्ट्या जी पतिपत्नी अत्यंत विजोड आहेत, दोन टोकांची दोन आहेत, जीं एकमेकांना विटून गेली आहेत, तडजोडीच्या पलीकडे ज्यांच्या मनाची अवस्था गेली आहे, अशा स्त्री-पुरुषांचीं उदाहरणे जास्त आहेत. अशा बदसूर जोडप्यांची या कायद्यानें काय सोय केली आहे?

शारीरिक दृष्ट्या एकमेकांना अनुरूप असल्यामुळें संतति निर्माण करून राष्ट्राच्या संपत्तींत भर घालणारी पतिपत्नी कित्येकदां मनानें एकमेकांपासून हजारों योजनें दूर असतात. शारीरिक अव्यंगता ही एकच गोष्ट संसार सुखाचे होण्यास पुरेशी आहे काय? महारोगासारखी दिसण्यांत भडक वाटणारीं कारणें दाखवितां आलीं नाहींत तरी स्वभावाच्या आत्यंतिक भिन्नतेमुळें, बौद्धिक विषमतेमुळें, एकमेकांबद्दल प्रेमभावनाच नसल्यामुळें, एकमेकांना एकमेकांचा अगदीं वीट आल्यामुळें, मनाविरुद्ध, फसवून तरुण किंवा वयस्क वराशी लग्न लाविल्यामुळें; लग्न करणाऱ्या स्त्रीपुरुषांपैकीं एक अत्यंत स्वच्छ तर दुसरा अगदीं गलिच्छ असल्यामुळें, सुशिक्षित असूनहि आळशी, क्रियाशून्य, केवळ चैनी, उधळ्या असल्यामुळें—अशा अनेक कारणांनीं स्त्रीपुरुषांचे आजचे कित्येक संसार, एकत्र राहूनहि, प्रेमाभावीं, एकमेकांबद्दल आदरभाव व विश्वास न वाटल्यामुळें, विच्छिन्न झालेले आहेत. एकत्र डांबलेल्या या नवराबायकोचीं मनें अत्यंत दुरावलेलीं, विस्कळित झालेलीं असतात. कायद्यानें

जवळ रहाणारीं ही जोडपीं एकमेकांचा तिरस्कार करीत असतात. एकमेकांच्या भेटीसाठी तळमळण्याऐवजी, आठ–पंधरा दिवस दर्शन न घडेल तर बरें असेंहि त्यांना वाटतें.

एकमेकाना अनुरूप नसल्यामुळें मनांतून दुःखीकष्टी असणारीं, निराश, उदास मनानें जीवन जगणारीं अनेक माणसें जोडपीं म्हणून समाजांत वावरत असतात. त्यांना जोडपीं तरी कसें म्हणावे आणि ती रहात असलेल्या घराला घर, त्याच्या व्यवहाराला संसार तरी कसा म्हणावा हा मोठाच प्रश्न आहे. ते एकमेकांशीं कधीं सरळ बोलणार नाहीत; कारण सरळ बोलण्याइतकीहि आपुलकी त्यांच्यांत शिल्लक राहिलेली नसते. कधीं बरोबर फिरायला, नाटक-सिनेमाला जाणार नाहीत; कारण त्यांना एकमेकांचे आकर्षणच नसतें. ‘ ही माझी पत्नी ’ किंवा ‘ हे माझे पतिराज ’ अशी आप्तसुहृदांमध्यें ओळख करून द्यायला ते कधी उत्सुक असणार नाहींत, कारण त्यांना एकमेकांचा अभिमानच नसतो. ते कधी एकमेकांना उत्तेजन देणार नाहीत. कारण परस्परांत कौतुकच शिल्लक राहिलेले नसते. मात्र समाजाला भिऊन आणि नैसर्गिक वासनांवर जय मिळविणे कठीण म्हणून त्याचे केवळ शारीरिक संबंध कायम असतात, इतकेंच !

‘ प्रणय ’ या शब्दार्थाची केवढी भयंकर थट्टा आहे ही ! हा काय संसार आहे ? संसाराची सुरुवात ही दोन व्यक्तींच्या सुखापासून होते. त्या दोन व्यक्तीनाच जर एकमेकांच्या सहवासात सुख वाटत नसेल तर त्यांना एके ठिकाणींच डांबून ठेवण्याचा अट्टाहास कां ? यापासून कोणाचा फायदा आहे ? अनुरूप असलेल्या स्त्रीपुरुषांना मानापमानाच्या, उच्च-नीचतेच्या व इतर लौकिक कारणासाठीं कायमचे दूर ठेवून एकमेकाबद्दल जिव्हाळा नसलेल्या स्त्रीपुरुषाना संसार करायला भाग पाडणे हा निव्वळ अत्याचार आहे.

अशा बळजबरीच्या संसाराचा गाडा कसाबसा रेटीत नेणारी अनेक जोडपीं मी पहातें आहे. माझ्याप्रमाणेंच तीं इतरानांहि दिसत असलींच पाहिजेत. उदाहरणादाखल सांगते. एका मुलानें आपल्या वयाच्या २८ व्या वर्षी वडील माणसांच्या संमतीनें एका मुलीशी लग्न केलें. पण लग्न झाल्यादिवसापासूनच ती त्याला आवडेनाशी झाली. कितीतरी दिवस माहेरची माणसें आणि सासरचीं माणसें यांच्यांत बोलाचाली सुरू होती. माहेरच्यांनीं मुलाला

दोष द्यायचा आणि सासरच्यांनी मुलीला दोष द्यायचा. लग्न केलेला मुलगा फक्त एकच उत्तर देई, "मी या मुलीला नांदवणार नाही. ती मला आवडत नाही." या साऱ्या भांडाभांडीत त्या मुलीचे हाल विचारूं नका. सासरच्यांनीं तिला माहेरीं आणून पोचवावी, माहेरच्यांनी तिला सासरी आणून गुदरावी. सासरची माणसे म्हणत "आम्ही तुला सांभाळणार नाही." माहेरची माणसें म्हणत "जीव गेला तरी तुला नवऱ्याच्या घरीच राहिले पाहिजे. नाहींतर आमची अब्रू जाईल." अशावेळी त्या मुलीनें काय करावें? तिला सासर किंवा माहेर यापैकी कोणतेच घर "आपलें" न वाटले तर तिची काय चूक आहे? जो तो स्वतःची कातडी बचवावयाला पाही आणि मुलीलाच दोष देई. कारण कांहींहि घडो, दोष शेवटी स्त्रीच्या माथीं फुटावयाचा ही समाजाची रीत आहे. खरोखरी ती मुलगी कांहीं म्हणाली नाही की "हा नवरा मला नको." पण नवऱ्याला जर ती लग्न झाल्या दिवसापासूनच आवडली नाहीं तर लग्नापूर्वी पहातांना त्याची अक्कल कुठें गेली होती? अखेर मोठ्या मिनत-वारीनें त्यानें तिला घरी ठेऊन घेतली नि केवळ निसर्गाचा विजय म्हणून त्या बाईला दोन मुलें झाली. पण ती बाई त्याच्यावर धुसफुसत असते. तो नवरा तिच्यावर चडफडत असतो. आपला हा चडफडाट झांकून ठेवण्याची काळजीहि ते घेत नाहीत. आणि लोक त्यांच्या या वागण्याला नावें ठेवून म्हणत असतात "कसं कां असेना, पण संसार करताहेत!"

एका मुलीचें नवीनच लग्न झालें. लग्न झाले आणि चार दिवसांनी ती मुलगी परत आली. ती कां परत आली हें ती घरीं आईबापांना धड सांगेना. नुसते रडत राही. जावई मुलीला घेऊन जाईल म्हणून बापानें महिनाभर वाट पाहिली. जावयानें एका अक्षरानेहि विचारपूस केली नाही. मुलीच्या बापाला मान-अपमान नसतो; आणि जगांतील सारी लाज त्याच्या वांट्याला आलेली असते. तेव्हा अखेर तो स्वतःच मुलीस सासरी घेऊन गेला. जावयानें बायकोस ठेवून घेण्याचे साफ नाकारले. कारण विचारतां त्यानें सांगितलें, "मला लग्नापूर्वी जी मुलगी तुम्ही दाखविली ती ही नव्हे. तुम्ही मला फसविलें."

अगदीं धडधडीत खोटी गोष्ट त्याने मुलीच्या बापाच्या माथी मारली. त्यानें असला खोटा व्यवहार मुळींच केलेला नाहीं. त्यानें जावयाला समजा-

वून, आर्जवून, रागावून, धमकावून नाना प्रकारें सांगितलें. पण जावयानें जी पाठ फिरविली ती कायमची.

पण आपली अब्रू टिकावी म्हणून बापानें मुलीला जावयाच्या घरी तशीच दोन महिने बळजबरीनें ठेविली. पण या अशा पतिगृही राहाण्याचें दुःख मुलीला किती असह्य झालें असेल याची कल्पनाच केलेली बरी. नवरा तिच्याशी बोलेना, तिच्या हातचें खाईना, कोणी आले म्हणजे तिरसटा-सारखे वागावे. " ही माझी बायको नाही. " असे म्हणावे. " तुझ्यावर फिर्याद करीन. " अशा तिलाच धमक्या द्याव्या. आणि साऱ्या गांवात— तिच्या तोंडावर सुद्धां— " हिच्या बापाने मला फसविले. " असे सागावे. अशा परिस्थितीत त्या मुलीनें कसे दिवस काढावे ? अखेर ती बापाच्या घरीं परत आली. आतां बापाचे घर तिचे राहिले नाही. स्वतःचे घर निर्माण होण्यापूर्वीच मोडून गेले. नवऱ्याच्या नांवाची काळी पोत गळ्यांत घालून मात्र राहिलें पाहिजे. कां तर ही त्याची बायको नसली तरी तो तिचा नवरा आहे ना ! शिवाय तो उजळ माथ्याने हिडतो आहे. हिचे मात्र बिचारीचें काळें तोंड !

पण बापाने जेव्हा जावयावर फिर्याद केली तेव्हां त्याचीच एकेक लफडी बाहेर आली. आतां अशा परिस्थितीत बायकोनें काय नवरा नेईल, मग मी संसार करीन अशी वाट पहात बसावयाचें ? उलट स्वाभिमानी मुलगी म्हणेल की, " मी परत अशा नवऱ्याकडे जाणार नाही." अशा मुलीला घटस्फोट मिळणेंच जरूर आहे.

एका मुलीचे नवीनच लग्न झाले. पण तिला असे आढळून आलें कीं नवरा अत्यंत अस्थिर वृत्तीचा आहे. आज इथे बिऱ्हाड कर की लगेच दुसऱ्या जागीं जा. आज ही नोकरी की उद्यां तिचा मागमूस नाही. खोटें बोलणें तर इतकें पांचवीला पुजलेले की त्याच्या कोणत्याच बोलण्यावर विश्वास म्हणून ठेवण्याची सोय नाहीं. पान, तंबाखू, सिगरेट ही त्याचीं कायम व्यसनें आणि स्वभाव असा तिरसटलेला, पिसाटलेला कीं तो घरांत आला की आपला कर्दनकाळ आला, राक्षस आला असें त्या मुलींला वाटे. त्याची संगत सोबत चांगल्या लोकांची नाहीं, तो चोऱ्या करतो ही गोष्ट एक दिवस या मुलीला कळली आणि तिच्या काळजाने ठाव सोडला.

मनानें जशी ही विरुद्ध टोकांची निघाली तशीच वैषयिक असंतुष्टताहि त्यांच्यांत प्रथमपासूनच निर्माण झाली. त्याच्या भीतीची तिनें इतकी हाय खाल्ली की एक दिवस ही मुलगी माहेरीं पळून आली. वाटेल तें केलें तरी ती नवऱ्याकडे जाण्यास मुळींच तयार नाही. तिला त्याचा इतका वीट आला आहे कीं त्याचें नांवसुद्धा ती ऐकावयास तयार नाहीं. अशा स्त्रीला 'तूं आपल्या नवऱ्याशीं तडजोड कर' असें सांगणें शहाणपणाचे आहे काय ? तिनें काय उभा जन्म चोराला पतिदेव मानून काढावयाचा ?

ज्यांच्यावर असे प्रसंग आले आहेत त्या स्त्रीपुरुषांना मुद्दाम भेटून मी विचारलें आहे. त्या साऱ्यांचा घटस्फोटाला संपूर्ण पाठिंबा आहे. ज्यांना "घटस्फोट" मान्य नाही तीं माणसें भरल्या पोटीं दुसऱ्यांना उपदेश करीत असतात. पण ज्या स्त्रीपुरुषांचे स्वभाव, मनोधर्म विरुद्ध टोकांचे निघालेले आहेत आणि ज्यांना जमवून घेणें, तडजोड करणें कष्टाचें झालें आहे, ते स्त्रीपुरुष एकत्र राहतात खरे. परंतु दोन चार स्त्रियांनीं तर माझ्याजवळ अक्षरशः असे उद्गार काढले आहेत. कीं "काय सांगूं हो; मला हिंमत नाहीं म्हणून. नाही तर असं वाटतं की या नवऱ्याचं तोंड पाहूं नये. मिळमिळीत सौभाग्यापेक्षा धडधडीत वैधव्य बरं. शक्य असतं तर एखाद्या अनुरूप माणसाशीं लग्न करून सुखी झालें असतें. पण काय करणार ?"

एका पन्नास वर्षे उलटलेल्या बाईनें एक दिवस आपले मन मोकळें केलें. नवरा म्हणजे नुसता खवीस. साधें बोलायचें तें सुद्धां अंगावर धावून आल्यासारखे. "तूं हेच केले नाहींस, तूं तेंच आणलें नाहींस, मला तूं विचारीतच नाहींस, माझी तुला पर्वाच नाहीं. मी जेवावें असें तुला वाटतच नाही. भाजींत मुद्दामच मीठ जास्त घातलेंस, अमक्याशीं बोललीस, तमक्याच्या घरीं गेलीस, तुझ्या बायकाच घरी फार येतात." एक न् दोन; सतराशें तक्रारी त्यानें उकरून काढाव्या आणि कांहीं कारणानें चार आठ दिवसांनीं तिला मारावें.

त्यांतून सदा ह्याच्या प्रकृतीला कांही ना कांही होत असावयाचे. एक दिवस तब्येत धड नाहीं. गलिच्छ तर इतका कीं त्याच्याकडे पाहातांच किळस यावी. "जुम्मे की जुम्मे" आंघोळ. कपडे सदा किटलेले,

विटलेले. पान-तंबाखूचा तोबरा तोंडांत तिन्ही त्रिकाळ. पानाचा चोथा तोंडांत सतत ठेवून ठेवून बापड्याचें एक गालफड कायमचें फुगून राहिलें होतें. लग्न झाल्यापासून त्याचीं तस्तें विसळतां विसळतां त्या बाईचा हात झिजला. एवढें करून माणसाचे बोलणे दारू प्यायल्यासारखे. किती केलें तरी त्याच्या मनास म्हणून येत नसे.

तो एकदां खूप आजारी झाला. इतका कीं तो बरा होईल असें कांहीं कोणास वाटलें नाही. बायको शुश्रुषा करीत होती. याची तक्रार चालूच होती. या दुखण्यांत तो मरणार हे भाकीत साऱ्यांनींच केलें होतें. पण तो मरणार या कल्पनेने बाई कांही घाबरून गेली नाही. उलट न मरतां जेव्हां तो तिला छळायला पुन्हां बरा झाला तेव्हां तिनें आपल्या नशिबाला हात लावला.

माणसांना आपले विचार, आपले मनोगत स्पष्टपणें बोलून दाखविणें शक्य नसतें. पण विपरीत संसार गळ्यांत पडला म्हणजे स्त्रीपुरुष एकमेकांना इतकीं विटून जातात कीं घटस्फोटाशिवाय, सेपरेशनशिवाय त्यांना दुसरा मार्गच नसतो. माणसे काही सुखासुखी एकमेकांचा तिरस्कार करीत नाहीत. पण त्यांच्या बेबनावाचीं कारणें महारोगासारखी दृश्य नसली तरी परिणामाच्या दृष्टीनें तशीच भयंकर असतात. अशा परिस्थितीतील स्त्रीपुरुषांचा दुःख निवारणाचा उपाय म्हणजे घटस्फोटच होय.

वटसावित्रीची पूजा करणाऱ्या सर्वच स्त्रिया जन्मोजन्मी हाच पति मिळूं दे अशी खरीच प्रार्थना करीत असतात काय ? कांही स्त्रियांना पतिप्रेमाचा लाभ झालेला असतो. त्यांच्या अंतःकरणांत भक्तिभाव असतोहि. अशा स्त्रियांचें खरोखरीच पतीवर आत्यंतिक प्रेम असतें. त्या मनापासून जन्मोजन्मी हाच पति मिळावा म्हणून देवाजवळ मागणें मागतात. पण अशा फारच थोड्या. ज्याचें साधारण पटत असेल त्या म्हणत असतील, "या जन्मीं तरी हा असूं दे. पुढच्या जन्माचं पुढें पाहतां येईल." परंतु ज्याच्या संसारांत रोज धुसफूस, भांडणतंटे चालू असतात त्या स्त्रिया लौकिक आचार म्हणून वटसावित्रीला हात जोडतात. पण ज्याच्याशी पटतच नाहीं तोच सहचर मला पुन्हां लाभूं दे असे म्हणणें हा वेडेपणा नाही काय ? पण बिचाऱ्या स्त्रिया ! लौकिक आचार पाळतात. भटजी बडबडत

असतो. त्या ऐकत असतात. "मम" म्हणा, म्हटलें "मम !" हात जोडा, जोडले हात. प्रार्थना करा, केली प्रार्थना. पण प्रार्थनेंतील अर्थ आणि मनांतील भावार्थ यांत किती जमीनअस्मानाचें अंतर असेल याची नुसती कल्पनाहि कोणी करीत नाही.

एक बाई नवऱ्याच्या जाचानें कंटाळून गेली आणि अखेर तिनें विहिरींत जीव दिला. जीव दिला खरा पण तो गेला नाहीं. जीव जावा म्हणून पाण्यांत उडी टाकली आणि जीव जातो, म्हणून घाबरून मग ओरडूं लागली. कुणी तरी मग तिला बाहेर काढली.

पण हिच्या डोक्यात जीव देण्याचें वेड आहे असे समजल्यामुळें नवरा तिला जास्तच छळूं लागला. सारखा तिच्यावर कोणाचा तरी पहारा. बाहेर जायचें नाही. जास्त बोलायचें नाही. नुसते काम करायचें. कैद्याचें जीवन जवळ जवळ तिच्या वांटयाला आलें. याचा परिणाम शेवटी असा झाला की त्या बाईला वेड लागलें. वेडांत ती नवऱ्याला शिव्या देई. त्यानें जो छळ केला त्याचा पाढा वाची. आणि "तुझा सूड घेईन" असें म्हणून व शिव्या देऊन ती त्याला मारायला धावे. माणूस एकदां विटला म्हणजे त्याला किती वीट येतो हें तिच्या बोलण्यावरून समजे. नवरा समोर आला की तिचें डोकें जास्तच भडकून जाई. अखेर डॉक्टरच्या सल्ल्या-वरून तिला नवऱ्याचें दर्शनसुद्धां घडणार नाही अशा ठिकाणी नेऊन ठेविली तेव्हां ती कांही प्रमाणांत सुधारली.

आतां या केसमध्यें नवऱ्याची मारहाण ही जखमा होण्यापर्यंत नव्हती. पण ज्याला छळण्याची कला अवगत आहे तो न मारतांहि अनेक प्रकारें छळूं शकतो. आजच्या कायद्यानें, मारहाणीचा प्रत्यक्ष पुरावा म्हणजे अंगावरील वळ, जखमा दाखविल्यासच तिला घटस्फोट मिळावयाचा आहे. तसें तर नाही. पण या नवराबायकोचें इतकें हाडवैर निघालें कीं शेवटीं त्या बाईला वेड लागलें. अशा स्त्रीला नवऱ्याशीं पटत नाहीं यास्तव घटस्फोट मिळावयास नको काय ?

उलट ती वेडी झाली म्हणून सात वर्षें वाट पाहून ती ठार वेडी झाल्यावर याला मात्र घटस्फोट मिळावयाचा. पण ज्या कारणानें तिला वेड

लागलें त्या कारणास्तव वेड लागण्यापूर्वींच तिला घटस्फोट कां मिळूं नये ? अशा प्रकारच्या स्त्रीपुरुषांची या कायद्यांत कांहींहि सोय नाही.

असा एक प्रश्न विचारला जातो कीं, जी स्त्री घटस्फोट घेणार तिच्याशीं पुनर्विवाह करण्यास जर तिला अनुरूप वर तयार नसेल तर घटस्फोटानंतर तिची स्थिति आगींतून उठून फुफाट्यांत पडल्यासारखी होईल. पण घटस्फोट मागणाऱ्या सर्वच स्त्रियांना विवाहच करावयाचा असतो असें नाहीं. उदाहरणार्थ, आपण असें समजूं या की एक स्त्री नर्स आहे. तिला २–३ मुलें आहेत. नवरा द्रव्यार्जनाचें काम करीत नाही. हिच्या जीवावर सारा चरितार्थ चालावयाचा. पण हा रोज विक्षिप्तपणा करून तिला त्रास देतो. " हिला नोकरीवर ठेवूं नका " म्हणून तिच्या वरिष्ठाला जाऊन सांगतो. " हिचें बिऱ्हाड ठेवूं नका " म्हणून घरवाल्याला सांगतो. वाटेल तेव्हां घरांतून नाहीसा होतो. आणि वाटेल तेव्हां धूमकेतूसारखा उगवून हक्कानें घरांत राहतो. बायकोनें मिळविलेले पैसे बळजबरीने खर्चासाठीं मागून नेतो. भांडण तंटे करतो. प्रसंगीं मारहाणसुद्धां करतो. अशा नवऱ्याचा जाच नको म्हणून या बाईस घटस्फोट हवा असतो. ती याच्यावर आर्थिकदृष्ट्या मुळींच अवलंबून नसते. उलट हाच तिच्या द्रव्यावर वाटेल तेव्हां डल्ला मारणार. तिच्या वैवाहिक जीवनाचें केव्हांच वाटोळें झालेले असते. अशा स्त्रीला त्याचें नांव लावण्यापलीकडे कांहीच उपयोग नसतो; मग ही व्याधी हवी कशाला ? कायद्यानेंच त्याचा संबंध तुटला म्हणजे वाटेल तेव्हां येऊन हा आपल्याला त्रास तरी देणार नाहीं एवढ्या समाधानासाठीं तिला घटस्फोट हवा असतो.

परंतु ही स्त्री मिळवती असल्यानें हा प्रश्न सुटला. जी स्त्री मिळवती नाहीं तिची वाट काय ? तिनें नवऱ्याचा जाच सहन करीत रहावें काय ? तिच्यासाठी विभक्तीकरणाचा उपाय कायद्यानें काढला आहे. रोज भांडण-तंटे करीत असंतुष्ट रहाण्यापेक्षां तिला वेगळें ठेवावें आणि तिच्या चरितार्था-ची संपूर्ण सोय नवऱ्याच्या मिळकतीप्रमाणें करण्यांत आली म्हणजे झालें. आणि तशी सोय कायद्यानें केली आहे.

बरें, एखाद्या पुरुषास घटस्फोट घ्यावयाचा असेल तर घ्यावा. परंतु घट-स्फोटित पत्नीच्या चरितार्थाची सोय ती आर्थिकदृष्ट्या स्वावलंबी नसल्यास

त्यानेंच लाविली पाहिजे, असा कायद्याचा आधार त्या स्त्रीस असला म्हणजे झालें.

स्त्रियांप्रमाणेंच पुरुषांचीहि अशी कुचंबणा होत असेल. पण अशा दुर्दैवी लोकांत स्त्रियांची संख्या अधिक आहे. कारण पुरुषानें या ना त्या उपायानें आपला मार्ग अशा आपत्तींतून शोधून काढलेला आहे. आज जरी दुसऱ्या लग्नाला कायद्यानें बंदी असली तरी कायदा होण्यापूर्वी पुरुषानें दुसरें लग्न करून आपलें समाधान मिळविण्याचा प्रयत्न केला आहे. स्त्रीची मात्र दुर्दशाच होत आली आहे.

अशीं किती उदाहरणे सांगावीं ? प्रत्येक व्यक्तीला—मग ती स्त्री अगर पुरुष कोणीहि असो—सुखी होण्याचा अधिकार आहे. तो अधिकार घटस्फोटाची सोय नसल्यामुळें हिरावून घेतला जातो. लग्न ही गोष्ट अशी आहे कीं विवाह झाल्यानंतर त्या जोडप्यांचे संसार सुखी अगर दुःखी होणें, ही गोष्ट एकमेकांच्या अनुरूपपणावर, शहाणपणावर आणि थोडीशी नशिबावर अवलंबून आहे. आपला जोडीदार अनुरूप निवडणें ही गोष्ट समजुतदारपणाच्या विवाहांत अधिक सुलभ असते. निदान त्यांत त्यांना तशा सवलती असतात. पण असे असूनहि कांही थोडे प्रीतिविवाह अयशस्वी झालेलेहि आपण पहातोच. ज्यांचे प्रीतिविवाह यशस्वी होतात त्यांना त्यांच्या निवडीबद्दलचे श्रेय देणें भाग आहे. परंतु ज्यांचे विवाह केवळ पांच मिनिटांत मुलगी पाहून होतात अशीहि जोडपी सुखानें संसार करीत असलेली दिसतात. अशी जोडपी एकमेकांना अनुरूप निघणें ही गोष्ट नशिबानेंच वांट्याला येते असें म्हणणें प्राप्त आहे. परंतु कोणत्याहि कारणाने कां असेना, ज्यांच्या विवाहातून दुःखाशिवाय कांहीं निष्पन्न झालें नाहीं त्यांना सुखी होण्याची संधी जरूर मिळावयास हवी.

पूर्वीच्या काळी माणसांचा हवाला वैवाहिक बाबतीत तरी नशिबावर असे. " जो माणूस जन्माचा सोबती म्हणून गळ्यांत पडेल तो आपल्याला अनुरूप नसला तरी त्याच्याचबरोबर संसार करणे भाग आहे, नशिब आहे एकेकाचें ! देव करतो तें बऱ्यासाठीच करतो——" असल्या विचारांचें प्राबल्य होतें. आतांची नवी पिढी आपलें आयुष्य केवळ नशिबाच्या हवाली करावयाला तयार नाहीं. आपल्या कर्तृत्वानें माणूस आपलें नशीब बनवीत असतो, आणि त्या दृष्टीनें त्यानें प्रयत्न करावयाला हवेत, असे नवे विचार सामान्य पण सूज्ञ माण-

सांच्या डोक्यांत येऊं लागले आहेत. ज्याला आपल्या मनासारखें दान पाडून घेतां येत नाही त्याचें स्वतःचें कर्तृत्वच खरोखरी कमी पडत असतें अशी कबुली द्यावयाला आजच्या तरुण पिढीतील विचारी माणसें तयार आहेत. पण असें हुकमी कर्तृत्व असणें हा अपघात आहे. सर्वसामान्य माणसें इतकीं कर्तृत्व-शाली असणेंच शक्य नाहीं, नि म्हणूनच त्यांना आपल्या चुकांची दुरुस्ती करण्याची संधि कायद्यानें मिळावयाला हवी आहे असें मी म्हणतें.

आपला जोडीदार निवडण्यांत एकदां चूक झाली किंवा कोणत्याहि कार-णानें नशिबाचा फांसा उलटा पडला तर चुकीची दुरुस्ती करतां न येणें, आणि नशीब सुधारण्याची संधि माणसास मिळूं न देणें हें असंस्कृतपणाचें लक्षण आहे. सुखी होण्यासाठी माणसानें कसलेंच बंधन मानूं नये, वाटेल तसें स्वैराचारानें वागावें असा माझ्या म्हणण्याचा विपर्यास कोणी करूं नये. व्यक्तीच्या व समाजाच्या सुखासाठींच नीतीचीं बंधनें माणसानें स्वतःवर घालून घेतलीं. पण माणसांसाठीं, माणसांनीं सुखाचे संसार करावेत म्हणून, नितीचीं बंधनें आहेत. संसाराचें वाळवंट झालें तरी चालेल पण बंधनें टिकविलीं पाहिजेत म्हणून कांहीं माणसे नि त्यांचे संसार नाहीत. आपण रहातों त्या समाजांत, फार काय, पण आपण रहातों त्या वाड्यांतील, चाळींतील, मजल्यावरील एकंदर जोडपीं मोजून पहा—त्यांतील किती जोडपीं एकमेकांना अनुरूप आहेत, किती जणांचे संसार गुण्यागोविंदानें नांदत आहेत आणि किती बदसूर जोडपीं नको असलेला संसार बळजबरीनें आदळआपट करून, नकली हास्याच्या आवरणाखालीं आपला दुःखी-कष्टी, सुखसंपत्तीविना दरिद्री झालेला संसार सुखाचा असल्याचा बहाणा करीत आहेत हें ध्यानांत येईल.

असें जर आहे तर प्रत्येकाला त्याच्या पसंतीनुसार संसार करण्याची संधी मिळावयाला पाहिजे. ज्यांचीं लग्नें एकदां होऊन चुकलीं आणि निराशाच ज्यांच्या पदरीं आली त्यांच्यावर तोच तो नको असलेला संसार करण्याची काय म्हणून बळजबरी ? कांहीं बायका ह्या असह्य जिण्यामुळें कायमच्या भ्रमिष्ट किंवा ठार वेड्या झालेल्या आपणांस दिसतात. दुःखानें माणूस वेडा झाला तरी चालेल पण त्याला नको असलेला संसार त्याच्यावर जुलुमानें लादून

आमची संस्कृति आम्ही टिकवितों, आमचें पावित्र्य आम्ही उज्ज्वल राखतों अशी घमेंड मारणें म्हणजे खोट्या अहंकाराची, दांभिकपणाची कमाल आहे !

माणसांच्या सुखासाठीं, स्थैर्यासाठीं आमच्या लग्नसंस्था आहेत. आणि समाजाच्या सुखासाठीं नि स्थैर्यासाठींच नीतिनियम आहेत. तें सुख जर आमच्यापासून दूर पळत असेल, आमच्या मनाला काडीचें स्थैर्य प्राप्त होणार नसेल, नुसत्या यातनाच जर आमच्या वांट्याला येत असतील आणि नीतिनियमानें आमच्या दुःखांतच केवळ भर पडत असेल तर असले नीति-नियम घेऊन काय करावयचे आहेत ? संस्कृति किंवा नीतिनियम हे कांहीं आभाळांतून एकाएकीं खालीं पडलेले नाहींत. आम्हींच ते बनविलेले आहेत. ज्या वेळीं ते घडविले गेले त्यावेळीं त्यांचा उपयोग झाला असेल. पण काळाबरोबर, परिस्थित्यनुरूप नीतिनियमांच्या व्याख्या बदलत असतात; बदलाव्या लागतात. माणसांना, त्यांच्या मुलांना, संरक्षण, स्थैर्य मिळावें म्हणून लग्नसंस्था अस्तित्वांत आली. ती नको असें मी मुळींच म्हणत नाहीं; ती हवीच आहे. ती नसेल तर माणसें पशुत्वाकडे जाऊं लागतील. आणि माणसांनीं प्रथम माणूस म्हणून रहावयाला पाहिजे हें कोणताहि सुधारक झाला तरी मान्य करीलच. पण लग्नसंस्था आज शेंकडों वर्षें ज्या स्थितीत आहे तेंच स्वरूप आजहि कायम राहिलें पाहिजे असा दुराग्रह धरून कसें चालेल ? काळाच्या ओघांत, परिस्थितीबरोबर माणसांचे प्रश्न, सुखाच्या कल्पना, अपेक्षा, महत्त्वाकांक्षा, आवडीनिवडी, नीतिनियमांचीं बंधनें हीं बदलत असतात. बदलावयालाच हवींत. कारण माणूस दगडासारखा गतिहीन राहिला तर त्याची प्रगति कधींच होणार नाहीं. परिस्थितीप्रमाणें आणि जरूरीप्रमाणें त्यानें नेहमीं चांगल्या सुधारणांचा अंगीकार करावयाला तयार असलें पाहिजे.

पूर्वीं स्त्रिया स्वयंपाकघरांतून फार तर माजघरांत येत असत. पण आतां त्या सभांनासुद्धां जाऊं लागल्या आहेत. पण ज्या स्त्रीचा शब्द ऐकूं येणेंहि कठीण, तीच आतां टेबलापुढें उभी राहून मोठमोठ्यानें भाषण करते, म्हणून ती गोष्ट नीतिबाह्य झाली असें कोणी म्हणत नाहीं. माणसाचें मन काळाबरोबर एखादा संस्कार मागें टाकीत असतें आणि त्या जागीं कधीं कधीं दुसऱ्याच संस्काराचा पगडा बसूं लागतो. त्याचें उत्तम उदाहरण

म्हणजे एकादा हिंदी किंवा मराठी चित्रपट पहातांना एखाद्या तरुणानें एखाद्या तरुणीचा हात धरून थोडीशी लगट केल्याचें दृश्य दाखविलें गेलें तर हिंदी प्रेक्षकांच्या मनांत प्रणयाच्या कल्पनेनें अंगावर रोमांच उभे राहतात. पण इंग्लिश चित्रपटांत अशी भावना उत्पन्न व्हावयाला प्रत्यक्ष चुंबन–आलिंगनाचींच दृश्यें हिंदी प्रेक्षकाला दिसावी लागतात. कारण सोवळ्या संस्काराच्या हिंदी माणसाच्या मनावरसुद्धां केव्हांतरी असा आणखी एक संस्कार घडून गेलेला आहे की इंग्लिश लोकांमध्यें परके स्त्रीपुरुष एकमेकांचा हात अगदीं सहज धरतात, त्यांत त्यांना कांहीं विशेष वाटत नाही. नि म्हणून आपल्यालाहि एवढ्याशा दृश्यानें कांही वाटत नाहीं. हे मनाचे संस्कार आहेत. हे संस्कार कांहीं आपण आपल्यावर पद्धतशीरपणें करून घेतले आहेत, कांही आपोआप झालेले आहेत. नि त्याला धरून प्रत्येक माणूस नीति–अनीतीची व्याख्या बोलून दाखवीत असतो. मग आजच्या काळांत ज्या नवऱ्याशीं बायकोचें पटत नाही, किंवा ज्या नवऱ्याचें बायकोवर प्रेम नाहीं अशा मनानें दुरावलेल्या स्त्रीपुरुषांनीं केवळ समाजाच्या मोहबतीखातर बळजबरीचा संसार करणे ही गोष्ट स्पृहणीय आहे काय ?

माझे हे विचार पुष्कळांना धक्के देतील. पटणार नाहींत. पण त्याचबरोबर कांहींना मनोमन पटतीलहि. ते उघड बोलून दाखविणार नाहींत. पण कोणीतरी या गोष्टींना तोंड फोडावयाला हवेंच आहे. एकमेकांबद्दलचें आकर्षण, प्रेम ही बळजबरीनें उत्पन्न करतां येणारी गोष्ट असती तर कित्येक ठिकाणीं चालू असलेले गुप्त प्रेमसंबंध आपल्याला दिसले नसते. असे प्रेमसंबंध ठेवणारी कांहीं माणसें जास्त कामुक आणि उल्लू असतात हें खरें आहे. पण सर्वच माणसें बेजबाबदार, उल्लू असतात असें म्हणतां येणार नाहीं. कारण त्यांचे बाकीचे व्यवहार चोख आणि सरळपणाचे असतात. पण ज्या व्यक्तीशीं जन्मभर संसार करावयाचा ती आपल्याला आवडणारी, आपल्यावर प्रेम करणारी, विश्वासानें मान टाकली तर जन्मभर आपल्याला आधार देणारी अशी असावी अशी स्त्रीची आणि पुरुषाचीहि अपेक्षा असणें अगदीं स्वाभाविक नाहीं का ? मग ज्या स्त्रीपुरुषांना त्यांचे जोडीदार त्यांच्या अपेक्षेप्रमाणें भेटत नाहींत, एवढेंच नव्हे तर अजीबात

विरुद्ध टोंकाचे भेटतात त्यांचें जीवन किती रूक्ष आणि दुःखीकष्टी असतें याची कल्पना केली तरी पुरे !

माणसाला त्याच्या अपेक्षेप्रमाणें कित्येकदां संधि मिळत नाही. निसर्गाशीं झगडा करतांना तो हार खातो नि म्हणून असले अनिष्ट प्रकार होतात. ते होऊं नयेत असें वाटत असेल तर मर्जीविरुद्ध, केवळ बळजबरीनें घातलेलीं विवाहबंधनें तोडून टाकण्याची सवलत कायद्यानें मिळावयास हवी.

विवाहित जोडप्याचें कोणत्या कारणानें जमत नाहीं हें तिऱ्हाईताला सांगून समजणार नाहीं. कारण खरीं कारणें कित्येकदां सांगण्यासारखीं नसतात नि म्हणून कोणी सांगूं शकत नाहीं. मग बायकोनें नवऱ्याबद्दल कांही तक्रार मांडावी, नवऱ्यानें बायकोच्या नांवाचा गाजावाजा करावा. पण हीं खरीं कारणे नसतात. जोडा खरोखरी कुठें खुपतो हे तो घालणारालाच समजतो म्हणून त्याच्या परिस्थितीत त्याला कांहीं सवलती मिळणें जरूर आहे.

ह्यासंबधी लिहितांना श्री. राजरत्न वा. वि. जोशी यानी " विवाहिताचें नंदनवन " या पुस्तकांत एके ठिकाणी असे म्हटले आहे की, " खरें म्हटलें तर दुःखी संसाराचीं कारणें फार दूरवर गेलेलीं असतात. तीं जाणण्याचीं आणि जाणल्यावर कबूल करण्याची तयारी मात्र फारच थोड्यांची असते. न पटणाऱ्या शेंकडा पाउणशें जोडप्यांचे तिटकाराचे कारण वैषयिक निराशा हेच असते. वासनांची तृप्ती ज्याच्यांत साधली आहे ती जोडपीं परस्परांवर अत्यंत आसक्त असतात; परतु ज्यांच्यांत वासनांची उपासमार झालेली आहे, अशी जोडपीं मनांतून एकमेकांचा इतका द्वेष करीत राहातात कीं त्यांच्यांत चालढकल आणि सहानुभूति काडीइतकीहि उरलेली नसते. स्वभावांतील विसंगती, बऱ्यावाईट खोड्या, शारीरिक व्यंगें, आर्थिक आणि सामाजिक हीन परिस्थिति याहि गोष्टी वैवाहिक जीवनांत बेबनावाचें विष कालवितात, नाहीं असें नाहीं. परंतु या सर्वांना जर मागें टाकणारी कोणती आपत्ति असेल तर ती वैषयिक निराशा होय."

मुलें असणाऱ्या स्त्रीपुरुषांनीं घटस्फोटाचा विचार मनांतसुद्धां आणूं नये असें अनेकाचें म्हणणें आहे. मुलांच्या हिताच्या दृष्टीनें असें वाटणें साहजिक आहे. पण ' स्त्रीजीवनविषयक कांहीं प्रश्नां'त श्री. सौ. कमलाबाई टिळकांनीं

याचा सुंदर उहापोह केला आहे. आणि सध्यांच्या कायद्यांतहि मुलांच्या दृष्टीनें फार समंजसपणानें विचार केला आहे असें वाटतें. मुलें ही कोणाची मालमत्ता नसून त्यांच्या हिताच्या दृष्टीनें तीं योग्य त्याच्या देखरेखीखालीं राहावयाचीं आहेत. कमलाबाई टिळक म्हणतात.—

"...मुलांची सर्वांगीण वाढ होण्यास उभय पितरांचें सान्निध्य पाहिजे हें खरें, पण हें सान्निध्य हितकारक केव्हां होईल? आईबाप एकमेकांवर मनापासून प्रेम करून घरांत सुखशांति नांदवीत असतील तरच. आई–बापांच्या रोजच्या खटक्यांत मुलें मूक किंवा बोलके साक्षीदार व न्यायाधीश होण्याची वेळ येत असेल तर मुलांना त्या सान्निध्याचा काय फायदा? जेथें आई–बापांची मनमिळणी नीट झालेली नाही व त्यामुळें उभयतांत सतत संघर्षणाच्या ठिणग्या पडतात, तेथल्या वातावरणांत मुलांची नीट वाढ होणें अशक्य आहे. अशा वेळीं घरांतील कलहांचें बीज जें आईबापांचें सहजीवन तें घटस्फोटांत नाहींसें करून मुलांभोंवतीं संतोष–समाधानाचें वातावरण निर्माण करणें हेंच त्यांच्या वाढीला हितकारक आहे. अशा वेळीं एकांगी वाढीचा तोटा सोसण्यास तयार झालें पाहिजे. नाहीं तर मुलें अजिब्रातच दुर्वृत्त किंवा विकृत मनोवृत्तीचीं होतील. तसेंच एखादे वेळीं आई किंवा बाप दुराचारी, व्यसनी, पशुतुल्य वर्तन करणारे, रोगी किंवा वेडे असल्यास, मुलांवर त्यांच्या सान्निध्याचा किती वाईट परिणाम होईल बरें! अशा वेळीं विवाहविच्छेद करून, दुर्वृत्त व दोषी असामीस वेगळें काढणें हेंच समाजाचें व दुसऱ्या पितरांचें कर्तव्य ठरणार नाहीं काय?"

आतां प्रौढ अपत्यवती स्त्री ही घटस्फोटास तयार होईलच असें सांगणें कठीण आहे. पण ती जर मिळवती असेल किंवा तिच्याशीं लग्न करण्यास कोणी तयार असेल तरच ती घटस्फोट घेण्यास तयार होणार. हें जर शक्य नसेल तर ती घटस्फोट घेणारच नाहीं. पण नवऱ्याशीं मुळींच पटत नसतांना, आपसांत तिरस्कार वाटत असतांना स्त्रीची सोय नाहीं म्हणून नवऱ्यास घटस्फोट मिळूं नये हा त्याच्यावर जुलूम आहे. कारण त्याशिवाय त्याला लग्न करतां येणार नाहीं. तेव्हां जीं पतिपत्नी नांदावयास तयार नसतील त्यांनीं सतत चार वर्षें एकमेकांचे संबंध तोडून आपलें पटत नाहीं हें सिद्ध करावें आणि मग घटस्फोट घ्यावा. मात्र हें सिद्ध केल्याशिवाय

घटस्फोट मिळूं नये. कारण घटस्फोटाची लहर आली आणि घटस्फोट मिळाला असें मुळींच होतां कामा नये. पाश्चात्य देशांत ही ओरड सुरू झाली आहे. त्यांच्या अनुभवानें आपण ही काळजी अगोदरच घ्यावी. पतिपत्नींचें पटत नाहीं हें सिद्ध व्हावयास चार वर्षें त्यांनीं एकमेकांपासून दूर राहून दाखविणें ही एक फार चांगली अट आहे. त्यांतून कित्येक जोडप्यांचें पुन्हां सर्व सुरळीत चालूंहि होईल. पण ज्यांचें खरेंच पटत नसेल त्यांची सुटकाहि होईल.

यांत आतां स्त्रीला घटस्फोट नको असेल तर नवऱ्यानें त्याच्या उत्पन्नाप्रमाणें तिच्या चरितार्थाची सोय करावी; असें कलम असलें म्हणजे झालें. शिवाय घटस्फोट घेतलेल्या स्त्रीशीं विवाहास कोणी तयारच होणार नाहीं असें म्हणतां येत नाही. अशीं उदाहरणें आतां समाजांत दिसूं लागलीं आहेत. 'स्त्री' मासिकाच्या ऑगस्टच्या ४८ अंकांत घटस्फोट घेतलेल्या एका स्त्रीची मुलाखत श्री. दि. बा. मोकाशी यांनी लिहिली आहे ती वाचल्यानें पुष्कळ गोष्टी ध्यानांत येण्यासारख्या आहेत.

द्विभार्याप्रतिबंधक कायदा झाल्याचें सर्वांना माहीत आहेच. पण तोसुद्धां एका अर्थी अपुरा वाटतो. ज्या स्त्रियांचे नवरे १५–२० वर्षें प्रथम पत्नीशी सुखासमाधानानें संसार करून नंतर दुसऱ्या लग्नास प्रवृत्त होतात, त्यांच्यावर असें बंधन आल्यानें त्यांच्या प्रथम पत्नींना हालांत सुख एवढेंच कीं ते त्यांच्याकडे अगदींच दुर्लक्ष करणार नाहींत. अगदीं राजरोस कायद्यानें परवानगी मिळाली म्हणजे प्रथम पत्नीची ते मुळींच परवा करणार नाहींत. त्यापेक्षां बंधनानें, त्यांच्या मनांत नसले तरी त्यांना बायकोची विचारपूस करणें भाग पडतें. एवढी एक समाधानाची जागा स्त्रियांच्या दृष्टीनें आहे खरी.

पण एक तर यांत पुरुषावर थोडासा अन्याय झाला आहे. एकाद्याचें आपल्या बायकोशीं पटत नसलें तर त्यानें तिच्याशीं बळजबरीनें संसार केलाच पाहिजे. बायकोशी पटत नाहीं अशा वेळीं केवळ कायद्याच्या बडग्याखालीं त्याला "चूप रहा" म्हणून सांगणें हें न्यायाला धरून नाहीं. ज्याप्रमाणें स्त्रियांना छळणारे, भिन्न मनोवृत्तींचे नवरे भेटतात त्याचप्रमाणें पुरुषांनाहि अशा चमत्कारिक स्वभावाच्या, अडाणी बायका भेटतातच. त्यांच्या

कांचांतून मोकळे होण्यासाठीं त्यांना द्वितीय लग्नाची परवानगी मिळणें जरूर आहे. आणि त्यासाठीं घटस्फोट घेणेंच आवश्यक आहे. जर घ्यावयाचा नसेल तर प्रथम पत्नीच्या बिऱ्हाडाची सोय करून त्यानें लग्न करावें. पण हें करण्यापूर्वी " माझें माझ्या बायकोशीं पटत नाहीं " ही गोष्ट त्यानें तिच्यापासून चार वर्षेपर्यंत दूर राहून सिद्ध करून दाखवावी.

शिवाय गंमत अशी कीं " तूं माझ्यावर प्रेम कर " असें म्हटल्यानें कांहीं नवरा बायकोवर प्रेम करणार नाहीं. प्रेम ही बळजबरीनें उत्पन्न होणारी गोष्ट नाही. आज तो कायद्याच्या कचाट्यांत सांपडला असला तरी लग्नाशिवाय दुसऱ्या जागीं त्याला " दुसरें बिऱ्हाड " करून राहतां येणार नाहीं असें थोडेंच आहे ? अनीतीच्या मार्गानें जाऊं नये, एका व्यक्तीनें दुसऱ्या व्यक्तीला अन्याय करूं नये एवढ्यासाठीं जे कायदे केले जातात ते सर्व बाजूंनीं विचार न करतां केले तर माणसें कायद्याच्या भीतीनें उघडपणें न वागतां तीच गोष्ट चोरून करूं लागतात. म्हणजे एकप्रकारें मूळ उद्देश बाजूलाच राहून उलट लपवून केलेल्या व्यवहारांना उत्तेजनच दिलें जातें. म्हणून द्विभार्याप्रतिबंधक कायद्याबरोबरच घटस्फोटाच्या कायद्याची आवश्यकता आहे. एका वेळीं एका पुरुषानें दोन बायका करूं नयेत असा दंडक असणे इष्ट आहे हें खरें. पण तरीसुद्धां एकमेकांना अनुरूप नसलेल्या स्त्रीपुरुषांना कायद्यानें जखडून ठेविल्यानें सुखी संसार आपण निर्माण करूं शकूं ही कल्पना केवळ भ्रामकपणाची आहे एवढेंच मी सुचवितें.

द्विभार्याप्रतिबंधक कायद्याला विरोध करतांना कांहींजण असें म्हणतात कीं पांढरपेशा समाजाच्या दृष्टीनें तो कदाचित् सुखाचा झाला असेल. पण खालच्या जातींतील लोकांना याचा जाचच झाला आहे. कारण शेतकरी वगैरे लोक जेवढ्या बायका करतील तेवढी त्यांच्या संसारास आर्थिकदृष्ट्या अधिक मदत होत असते. कारण तितक्या बायका शेतावर काम करण्यास उपयोगी पडतात.

पण त्याचबरोबर हें ध्यानांत घ्यावयास हवें कीं जेवढ्या त्या शेतावरील कामास उपयोगी पडतात तेवढ्या त्या भांडून भांडून घरादाराला जीव नकोसा करून टाकतात. स्त्री अडाणी असो कीं सुशिक्षित असो, तिला सवत खपणें कधींहि शक्य नाहीं. आणि पुरुष सुशिक्षित असो कीं अडाणी

असो, दोन बायकांशीं एकावेळीं एका घरांत राहून संसार करतांना त्याची अक्कल गुंग होऊन जाते. त्यालासुद्धां त्यांतून सुख होत नाही. कित्येक वेळेला मारहाणीचें प्रमाण वाढतें. एकादी बायको मधून मधून पळून जाते. आणि कधी कधी जीव घेण्यापर्यंतसुद्धां पाळी येते. दोन बायकांच्या दादल्याला जाऊन विचारावें, एकाहि बायकोचें सुख बिचाऱ्याच्या वांट्याला आलेलें नसतें.

त्यांतच दोन बायकांचीं मुलें; त्यांची भांडणें आणि वाढता संसार यांतून कामालाच काय एवढ्या प्रजेची मदत होत असेल ती ! पण शेतावर काम करावे आणि घरीं येऊन इतक्या लोकसंख्येनें मिळविलेलें सारें फक्त करून टाकावे. आणि समजा यदाकदाचित् अर्थार्जनाकरितां दोन बायकांचा उपयोग होत असला तरी सांसारिक सुख तिघांच्याहि वांट्याला आलेलें नसतें. त्या घरांत सुखसमाधान नसतें. एका नवऱ्याच्या दोन किंवा तीन बायका नेहमीं कष्टी, संतापलेल्या, असमाधानी अशा असतात. तेव्हां एका वेळीं २–४ बायका खालच्या वर्गालाहि करतां येत नाहींत याचें मला वाईट वाटत नाहीं. एका वेळीं त्यानेंहि एकाच स्त्रीशीं संसार केला पाहिजे हें बरोबर आहे.

पण थोडक्यांत म्हणजे स्वभावभिन्नतेमुळें ज्यांचे पटत नाही हें ज्यांनीं ४ वर्षे एकमेकांपासून दूर राहून सिद्ध केलें आहे, त्यांना घटस्फोटाची परवानगी दिल्यास हे प्रश्न सुटण्यासारखे आहेत.

स्त्रियांच्या तक्रारींची नीट दाद लावून घेतां यावी या दृष्टीनें श्री. सौ. रमाबाई पटवर्धन यांनीं "स्त्रियांचें कल्याण" या आपल्या पुस्तकांत एक योजना दिली आहे ती विचार करण्यासारखी आहे असें मला वाटतें. कोर्टकचेऱ्यांची संवय नसल्यानें स्त्रियांना त्यांची भीति वाटते. सर्वच व्यवहार पुरुषांशीं येत असल्यानें आपल्या खऱ्याखुऱ्या अडचणी त्या त्यांना मोकळेपणानें सांगूं शकत नाहींत. तेव्हां सौ. रमाबाई पटवर्धन लिहितात, "ग्रामपंचायतीच्या धर्तीवर फक्त स्त्रियांचें न्यायालय" म्हणून एक "पंचायतकोर्ट" नेमण्यांत यावें. यांत साधारण पांच ते सात स्त्री–सभासदांचा समावेश व्हावा.

या सात स्त्रियांपैकीं दोन स्त्रिया, अनुक्रमें जज्जाची पत्नी व वकिलाची पत्नी अशा असाव्यात; म्हणजे त्यांना कायद्याचे बाबतींत त्यांच्या पतीचा योग्य तो सल्ला मिळेल.

( आज वकील स्त्रियाहि मिळूं शकतील. )

तिसरी स्त्री मुलींच्या शाळेची हेड मिस्ट्रेस असावी. म्हणजे तिला इतर मास्तरणींच्या व मुलींच्या काय अडचणी आहेत हें समजावून घेतां येऊन त्यांचें निवारण करतां येईल.

चौथी स्त्री–सभासद डॉक्टरीण असावी. म्हणजे तिच्या खात्यांतील स्त्रिया आपल्या सर्व अडचणी व अन्याय तिच्यापुढें मांडूं शकतील. शिवाय डॉक्टरणीच्या ज्ञानाचा उपयोग, कांहीं गुंतागुंतीच्या प्रकरणांत, योग्य तऱ्हेनें होईल.

तीन स्त्रिया लोकनियुक्त असाव्यात, म्हणजे त्यांना स्त्रियांची सार्वजनिक बाबतीतील बाजू मांडतां येईल.

या तिन्हींपैकी एकजण सेक्रेटरी असावी.

असें फक्त ‘ स्त्रियांचें न्यायालय ’ स्थापन झालें म्हणजे स्त्रिया आपलीं गाऱ्हाणीं व अन्याय स्त्री–कोर्टापुढें निर्धास्तपणें मांडूं शकतील.

या योजनेसंबंधी आणखीहि खुलासा सौ. पटवर्धनांनी आपल्या पुस्तकांत केला आहे. जिज्ञासूंनी तो वाचून पाहावा. मी कल्पना येण्यापुरता त्यांतील उतारा घेतला आहे.

असो. स्त्रीजीवनविषयक कांहीं महत्त्वाच्या प्रश्नांचा मीं आतांपर्यंत विचार करण्याचा प्रयत्न केला. माझ्या या सर्व लेखांतून स्त्रीचें जीवन कोणत्याहि दृष्टीनें एकंदरीत परावलंबी असूं नये, असून भागत नाहीं यावर माझा कटाक्ष असल्याचें दिसून येईल. स्त्रीनें सारखें भांडत रहावें, सारखा वाद घालीत रहावें, सतत तराजूचा कांटा तोलीत ‘ माझे हक्क, तुमचे हक्क ’ असें हक्कांचें वजन करीत रहावें असें मुळीच नाहीं. पण अजूनहि स्त्रीवर्ग अशिक्षित आहे. स्त्रीच्या वृत्ती आजवरच्या परंपरेनें एकप्रकारें गुलामगिरींत आहेत तिला काय हवें, कशाची जरूर आहे हें अनेक कारणांनीं, तिचें ती ठरवूं शकत नाहीं. जिला ठरवितां येतें पण त्याप्रमाणें वागण्याचें धैर्य असत नाहीं, जिला समजते पण ‘ समजतें ’ असें सांगण्याचीसुद्धां चोरी होते

तिची अशा पारंपारिक, सांस्कारिक कुचंबणेंतून मुक्तता व्हावयास पाहिजे आहे. त्याशिवाय तिचें परावलंबित्व संपणार नाहीं. म्हणून कटु सत्यें अनेकांचा रोष पतकरूनहि लिहावीं लागतात. असें लिहिल्यानें अनेकांचा माझ्या दृष्टिकोनासंबंधीं विनाकारण गैरसमज होण्याचा संभव आहे. पण स्त्रीवर अन्याय होऊ नये असे म्हणतांना पुरुषालाहि अन्याय होतां कामा नये याहि सूत्राची जाणीव मी सतत ठेविलेली आहे. आणि या लेखमालेच्या कक्षेंत जेवढें लिहिणें शक्य तेवढें लिहून वरील गोष्टींची दखल मी घेतलेली आहे. खऱ्यासाठीं वाद घालणारी आधुनिक स्त्री ही स्त्रियांची पक्षपाती आहे असें अजूनहि कांहींना वाटतें. पण त्याला इलाज नाहीं. गुलामी वृत्तींतून बाहेर पडणारी, स्वतंत्र विचार करू शकणारी, सुशिक्षित स्त्री ही समजंस, मनमिळाऊ, प्रेमळ; तशीच संसाराची, पतीची, मुलांची जबाबदारी ओळखणारी आणि सुखाचा संसार करणारी निपजावी हीच माझीहि अपेक्षा आहे. ती बेजबाबदार, फटकून राहणारी, संसाराची कदर न करणारी असेल अशी समजूत करून घेणें हा निव्वळ गैरसमज आहे. या सर्व लेखांतून जबाबदार स्त्रीचे चित्र रेखाटण्याचा मीं प्रयत्न केला आहे. तिला समाजांतून, कुटुंबाकडून योग्य तो न्याय मिळेल तर ती सर्वांची कृतज्ञ राहील. पण हें जोंपर्यंत लांबणीवर पडेल तोंपर्यंत तिला हे झगडे करावे लागतील.

पण हळूंहळूं हे सर्व प्रश्न आतां सुधारण्याच्या मार्गावर येतील अशी अशा व्यक्त करून इथेंच थांबतें.



